


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन











अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

☐ अंक क्र. ३२७ : ऑक्टोबर ते डिसेंबर २००८

---



प्रकाशक :

डॉ. माधवी वैद्य

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

दूरभाष - ०२०-२४४७५९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह**
**महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.**

अक्षरजुळणी
**मेघा ग्राफिक सर्व्हिसेस,**
स.नं. १४/२३/४, घर नं. १५९८,
मोती बेकरीमागे, धायरी, पुणे - ४११ ०४१

मुद्रणस्थळ
**जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा,**
सिंहगड रस्ता, पुणे - ४११ ०४१

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : डिसेंबर, २००८

*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*

संपादकीय

# कथारूप

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

'माझं लेखन म्हणजे त्या कथेच्या रूपाचा मी घेतलेला शोध असतो. पुढे काय लिहिणार ते लिहिता लिहिता ठरत जातं. ते बरोबर की चूक, नैसर्गिक की कृत्रिम, ते मी आधी जे लिहिलेलं असतं त्यावरून ठरत असतं. गवयाच्या कानाशी जसा तंबोरा झणकारत असतो तसं कथेचं बीजरूप माझ्या कानात झणकारत असतं. त्याच्या अनुरोधाने मी पुढे सरकत असतो...' (गंगाधर गाडगीळ, 'एका मुंगीचे महाभारत' )

मन हे कथेचे प्राणतत्त्व आहे. त्यानेच जेव्हा मध्यवर्ती स्थान घेतले; तेव्हापासून नवकथा तंत्रमुक्त झाली. कथाबीज-कथेचे प्राणतत्त्व- एकदा गवसले की कथारूप घेण्यासाठी ते आपला स्वयंभू मार्ग आक्रमू लागते. लेखकाच्याही तो हातात राहात नाही. अॅमिबा सारखा त्याचा आकार विस्तारत जातो. कथेचा घाट हा मुक्त, प्रसरणशील, लवचिक आणि प्रयोगक्षम असतो. कथेतील जीवनचिंतनात कादंबरी, नाटक, चित्रपट आणि दूरदर्शनमालिकाही सामाविलेल्या असतात.

१९४०-४१ च्या आसपास मराठी कथा रचनातंत्राच्या चौकटीत लिहिली जात असताना गाडगीळांनी अपली कथा ही शैलीच्या अंगाने विकसित केली. कथाबीजाला त्याची अशी अंगभूत भाषाशैली असते. प्रारंभ-मध्य आणि कलाटणी देणारा शेवट अशा 'ओ-हेन्री', चेकॉव्हच्या मार्गाने जाणारी कथा तंत्रबद्ध रूपात स्वाभाविकता हरवून बसली होती. आपले देशी मन तिला सापडले नव्हते. प्रसंगप्रधान रंजकतेच्या मार्गाने, ती जीवनाच्या कृतक् तत्त्वज्ञानाची चर्चा करीत वाचकांना दिपवून टाकीत होती. फडके-खांडेकरांचे हे रंजनबोधवादी युग पहिल्या सुशिक्षित पिढीला रमविणारे होते. आजही दिवाळीअंकांच्या माध्यमातून हा प्रवाह बऱ्यापैकी जिवंत ठेवला गेला आहे.

पाश्चात्य प्रतिभेच्या प्रभावाने प्रकटलेल्या तंत्राधिष्ठित लघुकथेच्या प्रवाहास समांतर असा एक अस्सल देशी वळणाचा प्रवाह, १९व्या शतकाच्या प्रारंभी होता. श्री. म. माटेंच्या 'उपेक्षितांचे अंतरंग'च्या रूपाने तो अवतीर्ण झाला होता. पुस्तकी वळणाच्या काल्पनिक कथांना छेद देत त्यांनी स्वानुभवातून जीवननिष्ठ (जीवनवादी नव्हे !) कथा लिहिल्या. तारळखोरातील दरोडेखोर पिऱ्या आणि काडीमोड घेतलेल्या आईबापाचे लेकरू निराधार होते; तेव्हा 'बन्सीधरा ! तू आता कोठे रे जाशील ?' या संवेदनेने अस्वस्थ झालेल्या माट्यांचा प्रश्न आज ताजा आहे. विभावरी शिरूरकरांच्या 'कळ्यांचे निःश्वास' आणि मांग-गारूडी समाजाच्या अज्ञानाला 'बळी' पडलेला 'आवा', आजच्या अनुक्रमे स्त्रीवादी आणि दलितकथेच्या पूर्वखुणा आहेत. मराठी कथेच्या पाश्चात्त्य रूपतंत्राला नाकारणाऱ्या आहेत. नवकथेच्या रूपबंधाचे तीन आविष्कार म्हणून संबंधित समीक्षकाने तीन कथा वानगीदाखल निवडल्या आहेत. गंगाधर गाडगीळांची 'फॅण्टसी'- 'खरं सांगायचं म्हणजे...', जी. ए. कुळकर्णींची संज्ञाप्रवाही 'कैरी' आणि आनंद यादवांची ग्रामवास्तवाची 'इंजेन' ह्या तीन कथांच्या मूळ संहिता प्रारंभी पुनर्मुद्रित केल्या आहेत.

गंगाधर गाडगीळांची कथा जो आशय व्यक्त करीत होती- तो नेहमीच्या तंत्राने प्रकटणारा नव्हता; मनाच्या एका अवस्थेचे चित्रण करायचे होते. त्यांच्या 'खरं सांगायचं म्हणजे...' या कथेत चाकरमान्या मध्यमवर्गीय समाजाचे निर्जीव झालेले मन ! त्यांचा राग-लोभ-त्याग-कर्तृत्व सगळेच कोंडलेले ! घुसमटलेले ! याचे कथारूप करण्याचा मार्ग अनोखा होता. मग तो स्वतःच्या कल्पनाविश्वात 'फाकडे तलवार बहाद्दर' होतो. अमेरिकेच्या प्रेसिडेंडला ठणकावतो. "ब्रह्मपुत्रा नदीतल्या मगरींना 'मुस्कुराहट' म्हणतात आणि मुंबईत त्याला 'हास्य' म्हणायला लागले." ह्या चुकीच्या-दुरुस्तीसाठी गव्हर्नर जनरल लॉर्ड माऊंटबॅटन यांना त्वरित ऑर्डिनन्स लिहायची आज्ञा करतो. असा करारीपणा त्याच्यात येतो. स्टॅलिनच्या तोंडातील पाईप ओढून घेतो; आणि त्यांच्याजवळ असलेले सर्व अॅटमबॉम्ब जप्त करून अॅटमबॉम्बचे उत्पादनच बंद करतो. तसाच थेट व्हाईट हाऊसमध्ये जाऊन प्रेसिडेंटच्या ताब्यातील दोनशे अॅटमबॉम्ब जप्त करतो, सगळे अॅटमबॉम्ब आपल्याजवळ असल्यामुळे जागतिक युद्धाला सुरुवातच

होऊ शकत नाही...! हे गुपित तो आपल्याला सांगतो. दुबळ्या-मध्यमवर्गीयाच्या मनाचे वांझ अफाट कल्पनारंजन कथेच्या नेहमीच्या आकृतीबंधाला सोडून 'फॅण्टसी'च्या आश्रयाने हे कथानक साकारले. नवकथेचे हे पहिले पाऊल अपरिहार्य होते.

सज्जन-दुर्जन, नायक-खलनायक, खरे-खोटे, विष-अमृत, इत्यादि कथेत दिसते तसेच असणे, यात नाविन्य नाही. असे सरळ साधे-सोपे अपेक्षित कथानक सरळ कथातंत्रात प्रकट होते. हा परिचित मार्ग आहे; कारण येथे राक्षस राक्षसासारखाच वागतो आणि राजपुत्र राजपुत्रासारखा ! राजपुत्र आणि राक्षस यांच्यात तहनामा होऊन, त्यांची युती झाली तर हे आशयद्रव्य कोणत्या कथारूपात प्रकट होईल ? प्रत्यक्ष दृश्यात 'षटकार' मारणाऱ्या क्रिकेटपटूने केव्हा बाद व्हायचे, याचे आधीच 'फिक्सिंग' केले असे प्रेक्षकांना कळाल्यावर; आपण ज्याचा आनंद लुटला तो आनंद नव्हता. आपल्या रसिकतेची घोर फसवणूक झाली होती- हा अनुभव आणि मनाची अवस्था व्यक्त करायला- वेगळ्याच भाषाशैलीचा आश्रय आपण घेतो. 'xxxx ह्याला- त्याच्याच बॅटने, xxx करून, रस्त्यावर झोडपले पाहिजे'... 'अतिरेक्यांना भर रस्त्यात ओळीने फासावर लटकावले पाहिजे', एक ना दोन ! अशा वेळी स्वाभाविकपणे नेहमीची भाषा व शैली बाजूला ठेवली जाते. महाभारतातील 'मयसभा' असेच फसवे अनुभव देते. वास्तवातला हौद आणि चित्रातला हौद; वास्तव वृक्ष आणि भिंतीवरील चितारलेला वृक्ष... 'खऱ्या-खोट्यांचे विभ्रम ! सज्जनपणाच्या बुरख्याआडचा दुर्जन- - त्याला बळी पडलेल्या असहाय सरळमार्गी अशक्तांची व्यथा तानीमावशीच्या रूपाने जी. ए. कुलकर्णींच्या 'कैरी' कथेत आहे. तानीमावशी आपल्या पोरक्या झालेल्या भाच्याला मायेची ऊब देऊ पाहते. आपली ही अशरीरी भूक, आपल्याच अन्यायग्रस्त फाटक्या पदरामुळे पुरी होऊ शकणार नाही; म्हणून निराशेच्या गर्तेत स्वतःला संपवते. तिची घुसमट-जीवनाचा शाप घेऊनच येते. वास्तवाचे हे रूप- नव्हे बेरूप- विरुपिकेच्या शैलीत प्रकटते. कथाविश्वाबाहेरच्या जगाचे वास्तव कथासंहितेत 'फॅण्टसी', संज्ञाप्रवाही, कोलाज् अशा शैलीच्या अंगभूत मार्गाने व्यक्त होते. प्रस्थापित समाजरचनेच्या अन्यायकारक बंधनातून बाहेर पडण्यासाठी, विरचनेच्या (deconsturction) मार्गाने अण्णा भाऊ साठे, बाबुराव बागुल आदि लेखक जातात.

ग्रामीण कथेचा जिवंत 'खळाळ' आनंद यादवांनी मराठी कथाविश्वाला बहाल केला. ग्रामीण जीवनाचा नायक हा खऱ्या अर्थाने न-नायक (anti-hero) आहे. तो मालक नाही. त्याचे काहीच नसते. असते ते त्याचे भावविश्व ! बैलं, मोट, मोटेचा नाडा, शेरड्या, मेंढ्या... जित्राबं... यांच्या सहवासात त्याचे भावविश्व फुलते. ...एका स्थित्यंतराच्या फटक्यात त्या भावविश्वाचा पार चोळामोळा होतो. 'इंजेन'मधील सित्या आणि 'गोतावळा' मधील नारबाची उलघाल अस्सल ग्रामीण वाटेने प्रकट झाली आहे. यापूर्वीची हरीभाऊ आपटेंची 'काळ तर मोठा- कठीण आला' ही कथा दुष्काळाच्या अस्मानी संकटातील शेतकरी कुटुंबाच्या वाताहतीची आहे. कुटुंब जगविण्यासाठी प्राणप्रिय जनावरांना- ढवळ्यापवळ्याला- विकावे लागते. रामजी आणि त्याची पत्नी जयाबाई यांची होणारी तगमग हा या कथेचा आत्मा आहे. इतकीच अस्वस्थ करणारी वामन चोरघडे यांची 'अतिथी देवो भव !' ही 'शेतकऱ्याचे मन' केंद्रस्थानी ठेवून लिहिलेली कथा आहे. पोळ्याच्या सणालाच बैलांची 'जनावर' म्हणून झालेली अवहेलना सहन न झाल्याने, डॉक्टरच्या बायकोने दिलेली रूपयाची नोट, पैकूची बायको फाडून टाकते. ह. ना. आपटेंची- 'काळ तर मोठा कठीण आला !' आणि वामनराव चोरघडेंची 'अतिथी देवो भव !' ह्या दोन कथांमध्ये ग्रामीण साहित्य चळवळीची स्फुरणे दिसतात.

अण्णा भाऊ साठेंच्या कथांनी मराठी कथेला दलित मनाच्या असंतोषाची धग दिली. बाबुराव बागुलांपर्यंत यांचे आविष्कार हा एका परिच्छेदाचा विषय नाही. स्वाभिमानाने जगणे मारून टाकलेल्या समाजव्यवस्थेवरचे हे घणाघात आहेत. अण्णा भाऊंची 'स्मशानातलं सोनं', 'तमासगीर' यासारख्या कथांपासून साहित्यविश्वात 'त्सुनामी' अवतरले.

मनोविश्लेषणात्मक कथा-साहित्याचा 'पोत', 'फॅण्टसी', संज्ञाप्रवाही, 'कोलाज्' आणि विरचनावादी शैलीत विणला जातो. तोच कथेचा रूपबंध होतो. द. ग. गोडसेंनी 'पोत' ही योजिलेली संकल्पना यथार्थ आहे.

वस्त्राच्या विणण्यामागील धागेदोरे वस्त्राचा पोत ठरवितात. कथेचा पोत मनाच्या धाग्यादोऱ्यांनी-जाणीवनेणिवेच्या संवेदनांनी ठरतो. त्याला कोणत्याही तंत्रमंत्राने बांधता येत नाही. त्याच्या प्राणतत्त्वाच्या स्वाभाविक शैलीगत आविष्काराच त्याच्या अरूपाचे रूप प्रकटते. तोच कथेचा आत्मा आहे.

'अमृतानुभवा'तील दृष्टान्ताने याचा समारोप करावासा वाटतो.

*जैशा अकारादि अक्षरा । भेटती पत्रासही मात्रा ।*
*तैसे या चराचरा । दुसरे नाही ॥*

(पूर्णानुभूति - भाग २)

'अ'कारादि स्वनास अन्य मात्रा मिळून त्याचा स्वनिम-पदिम वाक्यविन्यासाने स्वयंभू अर्थाचा गाभारा उजळून निघतो. जीवनाचे विविध ओघ त्याला येऊन मिळतात. समग्र शब्दार्थ सृष्टी त्यांच्या मीलनात सामावली जाते. तो भेदाचा विषयच होत नाही. जसे प्रज्वलित झालेली ज्योत आणि प्रकाश यांचा वेगळा आकार नसतोच.

कथेची वीण आणि कथासंहिता यांचे वेगळेपण कथारूपात रहात नाही.

**या अंकात-**

कथेची स्थितीगती शोधण्यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे युवागट आणि मुक्त गटाची गंगाधर गाडगीळस्मृति कथास्पर्धा आयोजित केली होती. त्यासंबंधी श्री. शंकर सारडा यांचे स्वतंत्र निवेदन आहेच. मा. शंकर सारडा यांनी त्यांच्या स्वाभाविक निष्ठेने परीक्षणाचे काम चोख केले याबद्दल त्यांचे आभार मानतो. त्यामुळे पुनरुक्तीचा दोष टाळण्यासाठी- मर्यादित्वं विराजते!

-सु. कुलकर्णी
(संपादक)
७ गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग, अहमदनगर.
E-mail : suprakulkarni@gmail.com

## महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेसंबंधी निवेदन

महाराष्ट्र साहित्य परिषदेची सन २००१ पासून अमलात असलेली घटना पुनर्रचित करण्याचे काम सध्या चालू असून त्यासंदर्भात गेल्या सहा महिन्यात घटना समितीच्या तीन सभा आयोजित करण्यात आल्या होत्या. या सभांच्या द्वारे घटनेच्या संदर्भातील विशेष नोंदी संकलित करणे, कायदेशीर कागदपत्रांची जुळवाजुळव करणे, परिषदेच्या सभासदांशी पत्रव्यवहार करणे व त्यांच्याकडून सूचना मागवून घेणे. सभासदांनी पाठविलेल्या पत्रांचा परामर्श घेणे अशी काही प्राथमिक स्वरूपाची कामे हातावेगळी करण्यात आली आहेत.

साहित्य पत्रिकेच्या एप्रिल ते जून २००८ या कालावधीसाठी प्रकाशित झालेल्या अंक क्र. ३२५ मधून घटनेच्या संदर्भात एक निवेदनही देण्यात आले होते, हे आपणास माहीत असेलच. या निवेदनाद्वारे परिषदेच्या सभासदांकडून घटना दुरुस्ती संदर्भात सूचनाही मागविण्यात आल्या होत्या. सभासदांनीही आमच्या प्रयत्नांना चांगला प्रतिसाद देऊन आमचा उत्साह द्विगुणीत केलेला आहे. घटना समितीबरोबर राहून सभासदांनी घटनेच्या पुनर्रचनेच्या कामात आपला सहभाग दिला ही घटना, समितीच्या दृष्टीने समाधानाची बाब आहे.

परिषदेच्या सभासदांना या निवेदनाद्वारे पुन्हा एकदा सूचित करण्यात येत आहे की, परिषदेच्या विद्यमान घटनेतील 'उद्दिष्टे, नियम व उपनियम तसेच शाखांसंबंधीचे नियम या संदर्भात काही सूचना किंवा दुरुस्त्या सुचवायच्या असल्यास त्यांनी त्या पत्राद्वारे निमंत्रक, श्री. रत्नाकर कुलकर्णी, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे-३० यांच्याकडे दि. १५ जानेवारी २००९ पूर्वी पाठवाव्यात; ही विनंती.

आपले,

**रत्नाकर कुलकर्णी** (निमंत्रक) — **राजा फडणीस** (अध्यक्ष)



अनुक्रमणिका

श्रद्धांजली

# एक अनोखे पत्र

## टी. एन्. परदेशी

मुंबई शहरावर बुधवारी, सव्वीस नोव्हेंबरच्या रात्री अतिरेक्यांनी हल्ला केला, मुंबईच्या रस्त्यांवर नंगानाच केला. काळरात्र म्हणावी अशी ती रात्र. त्या रात्री झालेले दहशतवादाचे नृशंस, निर्घृण व अमानवी दर्शन दीर्घकाळ स्मरणात राहील. त्यानंतरच्या साठेक तासांच्या थरारनाट्यात चौदा पोलीस कर्मचारी-अधिकारी व सैन्यदलांचे दोन कमांडो धारातीर्थी पडले. अशोक कामटे, विजय साळस्कर, गजेंद्रसिंह, संदीप उन्नीकृष्णन यासहित, या सर्वांचे शौर्य व मरण सारखेच पवित्र व स्फूर्तिदायी !

अनुराधा रिंगणगावकर या पुण्यात राहणाऱ्या हेमंत करकरे यांच्या थोरल्या बहिणीने करकरेंच्या मृत्यूपश्चात् त्यांना लिहिलेले अनावृत्त पत्र शनिवार, एकोणतीस नोव्हेंबरच्या 'सकाळ' मध्ये पाहिलं, वाचलं आणि एका हुतात्म्याच्या थोरल्या बहिणीच्या संयमी वृत्तीला मी प्रणाम केला. भारतीय संस्कृतीत बहीण-थोरली बहीण अनेकदा आईची भूमिका पार पाडताना दिसते. अनुराधाताईंपेक्षा हेमंत वयाने बरेच लहान. त्यामुळे हे पत्र जरी बहिणीने लिहिलेले असले तरी त्यातील शब्द मात्र आईच्या मायेने ओथंबलेल्या हृदयानं लिहिलेले आहेत.

प्रिय हेमंत, म्हणून सुरू झालेलं हे पत्र खरंतर अनुराधाताईंचा हेमंतशी एकतर्फी संवाद आहे. पत्रभर बहीण भावाशी बोलतेय. तिच्या बोलण्यातून तिच्या कर्तृत्ववान, कर्तव्यपरायण, निष्ठावान, स्नेहशील, धाडसी व कलासंपन्न भावाची आपल्याला सहजगत्या ओळख होत राहते. बोलता बोलता भावाच्या वियोगाचं, त्याच्या मृत्युचं दुःख ती त्याच्याकडेच अत्यंत संयमाने पत्राच्या शेवटच्या चार-सहा ओळीत व्यक्त करते. हेमंत करकरे यांच्यासारखा मृत्यू लाभण्यासाठी जन्मोजन्मीचा पुण्यसंचय करावा लागतो. अनुराधाताईंचे पत्र हेमंत करकरेंच्या भाग्यवान, दुर्मिळ मृत्यूचे सन्मानपत्र आहे !

उत्तम साहित्य आधी निर्माण होते व त्यानंतर समीक्षेद्वारे उत्तम साहित्याचे मापदंड तयार होतात. उत्तम साहित्यास मानवीमूल्यांचे संदर्भ असावे लागतात; ते या पत्रास लाभले आहेत. या पत्रातून स्नेह, कलासक्तता अशा मानवी सहजवृत्तींचे दर्शन घडते. अंगी आत्यंतिक धाडसीवृत्ती असल्याशिवाय कोणतीही व्यक्ती "वीर" म्हणवली जात नाही. आत्यंतिक धाडसाने अनेकदा घात होतो, प्राणांची पर्वा राहात नाही, "तू स्वतःला जपायलाच पाहिजे होतंस" असं हे पत्र लिहिणाऱ्या बहिणीतील आई बोलते. या पत्रास "दहशतवाद" नावाच्या सैतानाच्या कृष्णकृत्यांची पार्श्वभूमी आहे. नायकाचे प्राणहरण या सैतानाने केलेले आहे; आणि त्याच्या वीरमरणाची गडद आणि शोकात्म छाया या पत्रावर पसरलेली आहे. उत्तम साहित्य अनेकदा उत्स्फूर्तपणाने निर्माण झालेले असते. याही कसोटीस हे पत्र पूर्णांशाने उतरते. या पत्रास जसे साहित्यमूल्य आहे तसेच त्यास प्रातिनिधिक स्वरुपाचेही मूल्य आहे.

सध्या विद्यार्थीरूपात असलेल्या पिढीला भविष्यकाळात दहशतवादाचा सामना प्रकर्षाने करावा लागणार आहे. हे पत्र विद्यार्थ्यांनी वाचले व अभ्यासले पाहिजे. त्या अनुषंगाने हे पत्र उच्च माध्यमिक पातळीवरील अभ्यासक्रमात समाविष्ट होण्याच्या दर्जाचे आहे.

**टी. एन्. परदेशी**
अहमदनगर.

# म. सा. परिषद कथास्पर्धा : काही निरीक्षणे

शंकर सारडा

युवक विभागात फारच थोड्या म्हणजे फक्त १५ कथा आल्या. एका कॉलेजमधीलच विद्यार्थिनींनी आठ कथा पाठवल्या. त्यामुळे हा गट प्रातिनिधिक मानता येणार नाही. या कथा बहुतांशी हकीकत सांगण्याच्या पातळीवरच रेंगाळतात. एखादी व्यक्तिरेखा, प्रेमाचा त्रिकोण, एखादा विश्वासघाताचा किंवा मानवी स्वभावाचा धक्कादायक अनुभव, एखाद्या नात्यातील संघर्ष वा दुरावा, पूर्वस्मृतीने वाटणारी हळहळ अशासारखे विषय या कथांना आशयद्रव्य पुरवतात. त्यातून कथानकाची तर्कसंगत उभारणी करण्याचे आणि निवेदनातले नाट्य पकडण्याचे कौशल्य फारसे दिसत नाही. कथास्पर्धेत मोजक्याच प्रवेशिका असल्याने हे कदाचित अपरिहार्य ठरले असावे. पहिला क्रमांक मिळवलेली कथा या सर्वांमध्ये उठून दिसते. सिसिफसच्या ग्रीक पुराणकथेचा प्रारंभीच उल्लेख करून, त्याला मिळालेली शिक्षा- मोठा दगड पर्वतावर न्यायचा आणि तेथून तो खाली पर्वताच्या पायथ्याशी लोटून द्यायचा; पुन्हा वर न्यायचा. ह्या सिसिफसच्या शापित प्राक्तनाचाच वसा आपण माणसे वाहत आहोत; काही काळ आपल्याला मिळणारा माणसाचा जन्म हा मृत्यूनेच नष्ट होणार असेल तर त्या जन्माला अर्थच उरत नाही; असा जीवनाच्या निरर्थकतेचा प्रत्यय क्षणोक्षणी जागवणारा या कथेतला नायक. "तू... तुला सुख नाही... समाधान नाही. दुःख नाही. तू भ्रमिष्ट, तू एकटा, तू शून्य, तुझं जगणं उगाचच. तुझं मरणं उगाचच. तुझं असणंही उगाचच... तू भोगणार आहेस तुझं जगणं... जे तुला नेमून दिलंय... तू मुक्त नाही, बद्ध नाही, तू शुद्ध नाही अन बुद्धही नाहीस... तुझ्या जगण्याला अर्थ नाही." अशा प्रकारच्या विचारांनी तो अंतर्बाह्य घुसमटून निघतो... या कथेत या नायकाचे इतके उद्ध्वस्त होण्याचा जो प्रवास आहे; तो व्यवस्थित फुलवता आलेला नाही. तो खरे तर कादंबरीचा विषय आहे... परंतु आपल्या हाती सापडलेल्या कल्पनाद्रव्यावर योग्य ते संस्कार करून ते फुलविण्याची आपली एक लेखक म्हणून असणारी जबाबदारी लक्षात यावी; या भूमिकेतून या कथालेखनाच्या प्रयत्नाला दाद द्यावीशी वाटते. जीएंची छाप जाणवते; पण त्यातून स्वतःची वाट चोखाळण्याची क्षमता विकसित व्हायला हरकत नाही.

प्रौढ विभागाला त्या मानाने चांगला प्रतिसाद मिळाला. पत्रासावर स्पर्धकांनी भाग घेतला. प्रेमाचा त्रिकोण, पूर्ववयातील प्रेमप्रकरणाची हळहळ, जुन्या मैत्रीला व प्रेमाला मिळालेला उजाळा; या पारंपरिक चौकटीतच गुंतून पडलेल्या आठदहा कथा आढळल्या. निवृत्तीच्या टप्प्यावर आलेल्या व्यक्तीने वा अतिदक्षता विभागात अखेरच्या क्षणांची प्रतीक्षा करणाऱ्या व्यक्तींने आपल्या गतजीवनातील बऱ्यावाईट घटनांचा मागोवा घेणे; यासारख्या आयुष्यकहाणी सांगणाऱ्या कथाही आठदहा आढळल्या. ग्रामीण किस्से सांगणाऱ्या शंकर पाटील पठडीतल्या कथाही चारपाच दिसल्या. ताई नव्हे आईच, प्रेमाला उपमा नाही यासारख्या शीर्षकाद्वारेच सर्व काही उघड करणाऱ्या कौटुंबिक कथाही अजून लेखकांना लिहाव्याशा वाटतात. त्या वगळता वेगवेगळी आशयकेंद्रे वा पार्श्वभूमी असणाऱ्या कथांची रेलचेल दिसली. बिहार मधून आलेले कामकरी, स्फोटकाची बॅग रेल्वे स्टेशनवर सोडून जाणारा अतिरेकी, कुष्ठरोग झाल्याचे कळल्यावर नातलगाचा त्याग करणारे आप्त स्वकीय, बांधकाम विभागातल्या अधिकाऱ्यांचे हेवेदावे, पर्यावरणाच्या हानीमुळे उद्भवलेल्या समस्यांची भीषणता, शतकानंतरचे जीवन यासारखे समकालीन आणि भविष्यकालीन विषयही या कथांमधून हाताळण्यात आले आहेत. लेखनतंत्रविषयक काही प्रयोगही आढळले. मानसिक विकृती वा कमतरता यामुळे काही व्यक्तींच्या वर्तनात एकांगीपणा वा अधिकारशाही यांचा प्रभाव दिसतो. त्यालाही कथारूप देण्याचा प्रयत्न दिसतो. त्यामुळे या स्पर्धेतील कथांचा एकूण दर्जा चांगला वाटला. एकदम अफलातून असे काही आढळले नाही; परंतु कथालेखन ही एक साधना आहे असे मानून काही पथ्ये पाळली तर यातील अनेक स्पर्धक आपली मुद्रा उमटवू शकतील. सुचलेल्या कल्पनेच्या कथात्मकतेच्या विविध शक्यतांचा तर्कसंगत विस्तार, विकास करणे

शक्य होते.

अशा स्पर्धेमधील कथांची क्रमवारी लावताना फार काटेकोर राहता येत नाही. 'पुरस्कारप्राप्त कथा गुणवत्तेच्या दृष्टीने अनेकदा समान पातळीवरही असू शकतात. तेव्हा या पुरस्काराचा अर्थ आपण कथालेखनात अधिक कार्यरत राहायला हवे, टिकून राहायला हवे असाच घेणे श्रेयस्कर ठरते.

❖❖❖

**शंकर सारडा**
ई-१० पाटील रिजन्सी,
१५ एरंडवणे, पुणे ४११ ००४.
फोन : ९८२३२६१०२३

---

# म. सा.परिषद गंगाधर गाडगीळ कथालेखन स्पर्धा – निर्णय

**प्रौढ गट**

१. सत्यकथा
विनय फाटक, ४ शिवतीर्थ सोसायटी, ४० एरंडवणे, पौड फाटा, पुणे ३८.

२. कैद
माधुरी तळवलकर, ई-६ अ गंगातीर्थ, सहकारनगर १, पुणे ९.

३. साखळी (मूळनाव - शेवटी काय वर घेऊन जायचे आहे ?)
जयंत बेंद्रे, सी-१६, ब्लॉक नं. ९, काजल सोसायटी, कोथरूड, पुणे ३८.

**युवा विभाग**

१. 'सिसिफसलेला'
संदीप कडू माळी, पुणे
(मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ७)

२. वयात आल्यावर
कविता साबळे, बी.ए.-२, सेंट मीराज् कॉलेज, पुणे.

३. स्वप्नसुंदरी
मयूरी वाघारे, बी.ए.-२, सेंट मीराज् कॉलेज, पुणे

**उल्लेखनीय**

१. आतातरी
पु. रा. रामदासी, १४४ कसबा पेठ, एफ-८, पुणे ११.

२. कवडसे
सौ. कल्पना रमेश धर्माधिकारी, ६ सुयोग हाईट्स, रामबाग कॉलनी, पौड रोड, पुणे ३८.

३. गेले ते दिन गेले
अनघा केसकर, ४ गोल्लीफ, लॉ कॉलेज रोड, पुणे ४.

४. दरिया दुलारी
भारती पांडे, एरंडवणे, पुणे ४.

कथा स्पर्धा युवा विभाग–प्रथम क्रमांक

# सिसिफसलेला...

संदीप कडू माळी

[एक ग्रीक मिथ.

देवांची गुपिते चोरल्याबद्दल सिसिफसला शिक्षा दिलेली असते. पर्वताच्या पायथ्यापासून शिखरापर्यंत दगड ढकलत न्यायचा. तिथून तो खाली ढकलून द्यायचा आणि परत वर ढकलत न्यायचा. असे निरंतर करीत राहण्याची ही शिक्षा असते.

जगण्यातील निरर्थकता नैराश्य यांनी घेरलेल्या प्रवृत्तीची ही कथा.]

खूप विचार. खूप प्रश्न. अन् शून्य उत्तरं घेऊन तो बसला होता. ताजी टवटवीत बीअर निरर्थक भासू लागली होती. तिच्या सहवासाची सुई चांगलीच बोचत होती. त्यामुळे त्याला काही-बाही वाटत होतं. क्षणभर. काहीतरीच. सिगरेट एखादी काळी शाल अंगावर पांघरते आहे... अन् तो घोटाघोटातून अंधार पितो आहे... असंच. असंच काहीतरी... वगैरे... या विचारानं त्याच्या अंगावर शहारा आला. पण त्या शहाऱ्याला काही अर्थ नव्हता. जसा त्या विचाराला काही अर्थ नव्हता.

हातावर उभे राहणारे काटे तळव्यावर का नाही उमटत? या प्रश्नानं त्याचं मन गढूळ झालं. अनंतात भरकटू लागलं.

आता त्याचे डोळे भिकाऱ्याला पाहतायत. गचाळ, माशांनी वेढलेला. कळकट घामाचा वास अन् मळलेल्या कपड्यांना घासणारे त्याचे उंद्री लागलेले केस. अनिर्बंध वाढलेली त्याची गिचमिची दाढी अन् त्याचं अख्खं शरीर पोसायला त्याने हातात धरलेला एक कटोरा. हा 'कॉमन मॅन' का नाही ?

सकाळ-दुपार-संध्याकाळ-रात्र यांचं अस्तित्त्व जर काही तासांचं असेल तर त्यांना अर्थ काय ? त्या आहेत तरी कशासाठी ? त्यांना कुणीकुणी चिकटवलेले काहीबाही अर्थ, त्यांचा आम्ही का म्हणून स्वीकार करायचा ? सकाळ जर आशेची एक नवी किरण घेऊन येत असेल; तर आयुष्यभर माणूस सकाळच का नाही अनुभवू शकत ? सकाळ-दुपार-संध्याकाळ-रात्र हे जर एक चक्र असेल तर माणसाचा जन्म हेही एक चक्रच आहे का ? अन् जन्मणारा जर मरणार असेल तर तो जन्मतोच कशासाठी ? या चक्रातून त्याला मुक्तता नाही का ?

असे काही प्रश्न. त्याच्या डोक्यात पिंगा घालतायत. त्याचं एकटक लक्ष त्या बीअरकडे आहे. ग्लास अलगद तिरपा करून भरला, तरी फेस आला तो आलाच. वर आणि सांडलाही बाहेर. ग्लास समोर टेबलावर ठेवून तो बसलाय. एकटक त्याकडे पाहत.

त्याच्या कानात त्याच्याच आवाजात कुणीतरी टकचन् ओरडून गेलं... chilled and strong... या आवाजानं त्याची विचारांची सर तुटली. अन् हातातली सिगारेट खाली पडली. क्षणभर. अन् त्याने ती तशीच बुटाखाली दाबून सराईतपणे विझवली. अन् पटकन पाय उचलून 'आऽ' ओरडला. त्याला चटका लागल्याचा भास झाला. त्याने पाय उचलून तळव्याकडे पाहिलं तर सिगारेटची काळी तंबाखू त्याच्या बूटाच्या सोलला चिकटून शेवटचा श्वास घेत होती. अन् तिच्यातून हलकेच निघणारा धूर शेवटचा श्वास घेत होता. क्षणभर त्याचं मन हळहळलं. त्या सिगारेटसाठी. काय हा प्रपंच ! एका क्षणी तोंडात... अन् दुसऱ्याच क्षणी पायात ? छे ! त्याची त्यालाच दया आली. माणसालाच फक्त हे जमणार.

मद्याच्या भरलेल्या ग्लासकडे पुन्हा त्याचं लक्ष गेलं. अन् तो थंड उसासे टाकत त्याच्याकडे पाहत बसून राहिला.

***

एक विमान आलं अन् त्या ग्लासात बुडालं. बीअरचा समुद्र हलकेच हादरला. त्यात ते विमान गिरट्या घालू लागलं. अन् गोल फिरता फिरताच त्याचा स्फोट झाला. समुद्र पुन्हा हलकेच हादरला. अन् पुन्हा शांत झाला. आता तो समुद्र आतून अख्खं वादळ पेलतोय. विमानाचे असंख्य तुकडे त्यात हळूहळू खाली बसतायत... कुठेतरी orange colour चा black box एका बाजूला हलकेच विसावतोय... सीटचे कुशन पूर्णपणे करपलेले... ग्लासाच्या एका कडेला चिकटून एक हात निसटत येतोय. ...एक, दोन, तीन, चार, पाच... पाच बांगड्या घातलेला हात. हातावरची मेंदी अजून स्पष्ट दिसतेय. एका कडेला घसरून खाली विसावणारी फणी... त्याला ओळखीची




**संदीप कडू माळी**

*जन्म :* *३०-११-१९८४*

*शिक्षण :* *एम्.ए. (मराठी) प्रथमवर्ग, एम्फिल्., पत्रकार पदविका.*

*व्यवसाय :* *आकाशवाणी केंद्र, शिवाजीनगर, पुणे येथे 'हंगामी वृत्तनिवेदक व भाषांतरकार' या पदावर कार्यरत.*

*आवड :* *वाचन व लेखन.*

*लेखन :* *'अक्षरवेदर्भी', 'ऊर्मी', 'इत्यादी' इ. नियतकालिकांतून कथालेखन आकाशवाणी केंद्र जळगाव येथून कथा प्रसारित. 'दै. लोकमत', 'दै. सकाळ', 'माहेर', 'अक्षरवेदर्भी', 'इत्यादी' इ. दिवाळी अंकातून कथालेखन.*

*सध्याचा पत्ता :* *संदीप कडू माळी, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७.*

*कायमचा पत्ता :* *३-अ, ललवाणी नगर, जामनेर, जि. जळगाव-४२४२०६.*

*भ्रमणभाष :* *९४२१५२१८८५*


---

वाटतेय... विमानाच्या पंख्याचं एक पातं... सोन्याची जाडशी तुटलेली चेन... समुद्राच्या वर आलेला इंधनाचा तवंग... हळूहळू तुकड्या-तुकड्यांनी विसावणारं विमान... तो न्याहाळतोय... थंडपणे... अन् या विमानाच्या तुकड्यांना आता जोडता येणे शक्य आहे का? या प्रश्नात तो गुंततोय...

प्रश्नांचा गुंता. तो सोडवण्यासाठी आणखी एक गुंता. त्याच्यासाठी आणखी एक. गुंत्यावर गुंता गुंता... ग... [... त... ा... तो गुंत्यात अडकतोय... क्षणभर बीअरच्या ग्लासाकडे पाहतो अन् त्याच्या लक्षात येतं की त्यावर अतिथंडाव्यामुळे दंव जमलेत. ते पुसण्यासाठी म्हणून तो हात उचलू लागतो. तोच ग्लासाच्या वरच्या टोकाहून एक थेंब निघतो. खाली निसटतो. ते गेल्याच्या खुणा उमटवत टेबलावर, ग्लासाच्या तळाशी विसावतो. फक्त एका तेवढ्याच रेषेतून त्याला आतलं काही दिसतंय... तो ते पाहण्याचा प्रयत्न करतो... उर्वरित दंव न पुसता.

आत एका मुलीने उडी मारली, अन् ती सूर मारत त्यात पोहू लागली. एका टोकाहून दुसऱ्या टोकाकडे.. ती पोहतेय. पण तिचा चेहरा मात्र दिसत नाही. त्याच एका रेषेतून तो तिला पाहतोय... कधी फक्त तिचं डोकं, कधी पाठ तर कधी तिच्या पायाचे तळवे... कधी फक्त हाताची बोटं... एवढंच तो फक्त न्याहाळतोय. तिचा चेहरा मात्र त्याला दिसत नाही. क्षणभर त्याचं मन तिला पाहण्यासाठी आतुरतं. तो त्या थेंबांना शिव्या घालतोय. हातानं त्यांना संपवून तिला पहावं म्हणून तो हात उचलेल तोच चार-दोन थेंब एकत्र येऊन ग्लासाच्या टोकाकडे सूर मारतात. पुन्हा काही मार्ग त्याला खुले होतात. ती एखादा मासा पाण्यात विहरावा मुक्तपणे, तशी पोहतेय... त्याने सिगारेट पेटविली. अन् ती अचानक त्यातून बाहेर उडी मारते... सिगारेटच्या धुरात विलीन होते... हे सारं तो अविचलपणे... थंडपणे पाहतोय... आता तो अधिकच खोलात जातो. विचारांच्या तंद्रीत. तल्लीन. भोवतालचा त्याला केव्हाच विसर पडलाय. आणखी पेटत्या सिगारेटचा अन् समोरच्या बीअरचाही...

***

माहे १८००/- किराणा व इतर खर्च, ३००/- दूध, १२५०/- औषधे अन् ३५००/- पगार ! अजूनही खिशातले पैसे भाजताहेत छातीला. अंधारात कुढत कुढत काढलेल्या रात्री. आवाजांनी नि हातांच्या स्पर्शांनी ओळखलेल्या त्या अंधारलेल्या वस्तू. आठ बाय आठची खोली. खोलीतल्या पिसवा. ढेकणं. डास. दिवसभराचा थकवा. अशातही निवांत झोप.

खुर्चीत बसल्या बसल्या तो घरातला कुबट, घामेजलेला वास त्याच्या नाकात शिरला. पिसवा चावू लागल्या. खोलीतला मंद प्रकाशही त्याला अंधारल्यागत वाटू लागला. अन् तो अधिकच खोलात शिरू लागला. मागे. भूतकाळात...

खर्च ! खर्च !! खर्च !!! बापाचा आवाज कानातच बसलाय्... तरी त्याला आठवतं. बाप खर्चाच्या नावानं ओरडत असला तरी त्याची बावडी (आजी) त्याला लहानपणी पैसे द्यायची. ते तिने त्याच्या बापाकडूनच घेतलेले असायचे. त्याला जवळ बोलावून हळूच ती हातात काही पैसे देत म्हणायची, 'एक गायछाप आण अन् चाराण्याच्या खोबरगोळ्या तू घे.'

ॲम्ब्युलन्स बाहेरून गेली अन् तिच्या हॉर्नच्या चौफेर आवाजानं त्याची तंद्री भंगली. हातातली सिगारेट केव्हाच विझली होती. अन् ग्लासावरच्या दंवाच्या थेंबांनी केव्हाच टेबलाशी तह केला होता. आता त्याला ती बीअर स्पष्ट दिसत होती. त्यात बरंच काही दिसत होतं. त्याचं घरदार... अन् काहीबाही...! त्याला ती उचलून तोंडाला लावायची हिंमत झाली नाही. त्याचा बाप दारू दारू म्हणतच मेला होता. त्यानं त्याच्या बापाचं सडलेलं पोट पाहिलं होतं, तो वास अजून त्याच्या नाकात होता. तो घराबाहेर पडताना त्याचा बाप त्याला म्हणायचा, 'मला दारू आण.' त्यानं नाही आणली की तो अंथरूणातूनच केविलवाणा पाहायचा. पण पुन्हा बोलायचा नाही. दुसऱ्या दिवशी पुन्हा तीच मागणी. त्याचं तसंच वागणं. त्याच्या बापाचं तसंच केविलवाणं पाहणं. तरी एकदा त्याच्या बापानं अंथरूण सोडलंच. अन् तर्र पिऊन आला. घरात येताच भळाभळा ओकला. त्या वांतीची शिसारी अजून त्याच्या नाकात होती. क्षणभर त्याच्या हृदयाची धडधड वाढली. हाताला कंप सुटला. समोरचा बीअरचा ग्लास आग ओकत होता. पेटला होता. एखादा समुद्र पेटावा तसा. त्याचा बाप त्याला त्यात जळताना दिसत होता. त्याचं घर जळत होतं. त्याची बावडी त्या घरात दोघांचं करून थकली होती. खंगली होती. अन् त्या प्रेताच्या बाजूला हा शून्य उभा. त्याची बावडी वजा होतेय. त्याची आई कुण्यातरी ढेरपोट्या अन् सोन्याची जाडशी चेन घातलेल्या मारवाड्याच्या हातात हात धरून उभी. निर्विकार ! तिसऱ्याचंच प्रेत जळताना आपण पाहत असतो. तशीच. अगदी तशीच.

***

त्यानं सिगारेट काढली. पेटवली. क्षणभर उभ्या ग्लासकडे पाहिलं. त्याला त्याच्यात पल्ली दिसली. त्याची लहानखोर बहीण. त्याला आठवलं, तो सकाळी उशिरापर्यंत झोपलेला असायचा. ती त्याच्याजवळ दुडूदुडू धावत यायची. 'हरि मुखे म्हणा हरि मुखे म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥' असं हरिपाठ म्हणत त्याचं डोकं तिच्या इवल्याशा मांडीवर घ्यायची. त्याच्या केसांतून बोटं फिरवायची. कधी कधी तिच्या या विभ्रमांनी त्याला जाग आलेली असायची. पण तो मुद्दाम तसाच झोपेचं सोंग घेत डोळे न उघडता पडलेला असायचा. ते सर्व अनुभवायचा. ती म्हणायची, "भगवान श्रीकृष्ण गीतेत म्हणतात, 'बालक, उठा. सकाळ झाली. आराम हराम है.'' अन् मोठ्यानं हसत तो उठायचा. तिला कवटाळायचा. तीही तिची मान त्याच्या छातीवर घुसडायची अन् हसत हसत ती चिमुरडी पोर त्याला म्हणायची, 'दादड्या, उठ आता. आंघोळ करून घे.' एवढी लहान असूनही त्याला ती त्याची आईच वाटायची. तो मन भरून तिच्याकडे बघायचा. म्हणायचा, 'तुझं ना, lamination च करायला हवं. मोठीच होऊ नको. अशीच रहा.'

संध्याकाळी वैतागून घरी आल्यावर ती चिमुरडी पोर त्याची वाट पाहत असायची. अन् त्याचं घरात पाऊल पडताच, "आलाश...!" असं म्हणायची. तिचा तो चेहरा पाहिला की सारी मरगळ दूर व्हायची. कधीकधी ती त्याच्या घरातली जुनी साडी डोक्यावरून मिरवत असे. अन् तो समोर दिसला की, 'मला साडी नेसव.' असा आग्रह धरत असे. तेव्हा एक भीती उगाच त्याच्या डोक्यात ठणकू लागे की, ही खरंच एका दिवशी या घरातून जाणार. मग या घराला रहायला काही कारण असणार नाही.

तो भानावर आला. एक डास त्याच्या हातावर बसला होता. बोटातली सिगारेट अर्ध्यावरच विझली होती. समोरची बीअर तशीच. निर्विकार ! डास त्याने उडवला. अन् बीअरच्या ग्लासाकडे पहात राहिला. दारू भट्टीत कामं केलेली त्याला आठवली. तो धूर, घाम, घुसमट, मळलेले कपडे, आंबट वास, घामेजलेली शरीरं, लाकडाच्या रिफा, विटांच्या मोठाल्या चुली, कढया... मालक अन् कामगार मारायचे, चिडवायचे, लाथाडायचे, राबवून घ्यायचे. सहन करत करत काढलेलं बालपण. ती गावाबाहेरची रोषणाई. तिथं निनादणारे ढोलकी, पेटी अन् पैंजणांच्या छुम्छुम्चे आवाज. नाचणाऱ्या बाया. गॅलरीत

उभ्या असणाऱ्या वेश्या. हा जायचा बापाला शोधायला. तेव्हा त्याच्याकडे पाहून 'ए नल्ले !' अश्या हाका. त्याचे कान पिचले त्या हाकांनी. डोळे थकले बापाला शोधता शोधता...

घरी अंथरूण धरलेली पल्ली. तिचं औषधपाणी. बावडीचा खोकला. आईचा रडका संसार. बापाचं कर्ज. त्याच्या वसुलीसाठीचा त्या मारवाड्याचा त्याच्या घरात एका रात्रीचा मुक्काम. त्यासाठी बाहेर झोपून काढलेल्या गोठ्यातल्या रात्री. गल्लीतल्या पोरांचे टोमणे. पल्लीच्या अंथरूणावरच्या माश्या. उंदरांनी कुरतडलेली तिची गोधडी. आईचा तिचं करण्याचा कंटाळा. कधी बावडी तर कधी तो. मिळून वाटून धुतलेल्या तिच्या गोधड्या. त्या गोधड्यांचा वास. तो पिंगटपणा. ठणकणारं डोकं. किती अन् काय. सहन करण्यापलिकडचं आयुष्य. पल्लीच्या औषधासाठी केलेली चोरी. पकडल्यानंतर खाल्लेला मार. ते लाथाडणारे पाय अन् डोळ्यांसमोर पल्लीचं मरणाकडे निघालेलं सडकं शरीर. घरी आल्यानंतर घरातली मरणाची शांतता. आई स्वयंपाकघरात मारवाड्यासोबत अन् बाहेर पल्लीच्या प्रेताजवळ बसून टिपं गाळणारी बावडी. पिऊन आलेला बाप अन् पल्लीच्या मढ्याजवळचा त्याचा टाहो. रडण्याच्या भरातच त्याची तिच्या मृत शरीरावरची वांती. संतापाने बापाला उचलून घराबाहेर लाथाडत फेकणं. बावडीचं 'नाही रे भाऊ नको रे भाऊ...' असं म्हणत ओरडणं. आईचा तो घरातला शेवटचा दिवस. सारं... सारं त्याला आठवत राहिलं अन् तो अधिकच तुटत गेला. विस्कटत गेला. शून्यात गेला.

***

बीअरचा ग्लास त्याच्या डोळ्यांसमोर. निश्चल बसून. तो खुर्चीवर खिळ्यांनी सांधल्यासारखा. त्याचे हात खुर्चीच्या हातांवर अडकवल्यासारखे. येशूला उभा क्रुसवर लटकवलेला त्याच्या समोर.

तारुण्य भटकणारं भूत. हिंडतय. अन्न शोधतय. वस्त्र धुंडाळतय. निवारा हरवलाय. आभाळाला बाप अन् जमिनीला आई मानत दिवस काढायचे तर बाप अन् आईच्या संकल्पना सडलेल्या. कुजलेल्या...

या जगाच्या कोपऱ्यात विखुरलेलं अन्न तुला सापडत नाही.

पृथ्वीवरचा निवारा तुला गवसत नाही.

सुख-समाधानाच्या व्याख्या तुला येत नाही.

तू कुजलाय. बुजलाय. विचारांच्या गोत्यात. फाटक्या नशिबाच्या भोवऱ्यात...

हसणं विसरलेला तू. धुंडाळत राहणार ब्रह्मांड, पृथ्वी, पाताळ-तिन्ही लोक. तुला सापडणार नाही जे हरवलंय ते...

तू असाच फिरणार. भ्रमिष्ठासारखा.

ही पृथ्वी तुझ्यासाठी. समुद्र तुझ्यासाठी. वारा, अन्न, पाणी, हवा, निवारे, दगडं, जमीन, माती, रेती, नाती, पाती, वाती, दिवे, रस्ते, देव, मंदिरं, झाडं, गवतं, डोंगरं, पहाडं, रानं, रात्री, दिवस, सकाळी, संध्याकाळी, सूर्य, पक्षी, उंदरं, घुशी, कुत्रे, मांजरं, डुकरं, हत्ती, गाय, बैल, म्हैस, जमीनजुमला, सगळं घे. तुझ्यासाठी. तुलाच. तुझंच.

फक्त सुख नाही तुला अन् दुःखही नाही.

ते गेलं मरून. पल्लीसोबत.

ते गेलं थकून. बावडीसोबत.

ते गेलं सोडून. आईसोबत.

ते गेलं वाहून. बापासोबत. त्याच्या वांतीसोबत.

आता तूच आहेस. एकटा. या पृथ्वीवर विखुरलेलं सुख तुला बघता येणार नाही. स्पर्शता येणार नाही. भोगता येणार नाही. दुःख गिळून बसलेला तू बुद्ध जरी झालास, तरी तुझ्या चेहऱ्यावर भावना असणार नाहीत. अन् लक्षात ठेव तेव्हा तू दगडही असणार नाहीस.

मेल्यानंतर तुझं शरीर मरणार नाही. शरीराचे धर्म ते पाळणार नाही. तू माणूस नाही. पशू नाही. देव नाही. राक्षसही नाही. तू कुणीच नाही. काहीच नाही. म्हणून तू भूतही नाही.

भटकणाऱ्या भुताला गवसत नसतं काही. त्याचं हरवत असतं. तो हरत असतो. फक्त.

***

तो भानावर आला. त्याला प्रचंड घाम फुटला होता. हृदयाची धडधड वाढत होती. कानांत रेल्वेचा हॉर्न जोरात घुमू लागला. आत्महत्येचा केलेला पहिला फसवा प्रयत्न त्याला आठवला. तेव्हाचं सुख त्याला आठवलं. गाडीच्या रूपात साक्षात मरण समोरून दौडत येतंय् अन् त्यानं डोळे मिटलेले पार... काय सुख होतं ते ? बंद डोळ्यांसमोरही तेव्हा बावडी अन् पल्ली दिसल्या होत्या.

पण तरी तो वाचलाच. त्याला माणूस ठरवणाऱ्या अन् जगण्याचे हक्क बहाल करणाऱ्या माणसानेच त्याला वाचवलं. म्हणून आज हे भोग तो भोगतोय. कितीतरी दिवस त्या दिवसानंतर भ्रमिष्ठासारखे गेले. सतत आत्महत्येचा विचार डोक्यात घेऊन जगणं. रस्ता क्रॉस करताना डावी उजवीकडे न पाहणं. बेदरकारपणे पळणं. धावाधाव. पळापळ. सालं, जगण्यावर उदार झालेलं मन. ते केव्हाच मेलेलं. शरीर फक्त जिवंत. त्याचे भोग अजून संपायचे आहेत.

समोरचा बीअरचा ग्लास हादरला. त्याने त्यात उडी मारली. कुठलीही हालचाल नाही. ग्लास फक्त हलकेच हादरून शांत. तो ग्लासाच्या तळाशी जातोय. श्वास घेता येत नाही. डोळे उघडता येत नाही. बाहेरचं काही ऐकता येत नाही. तरी त्याने डोळे उघडले. श्वास घेतला. त्याच्या रंध्रारंध्रातून ती रक्तासारखी वाहू लागली. त्याला दिसली पल्ली. वावडी. हसत होत्या. बावडीच्या विरत गेलेल्या केसांची वेणी पल्ली कुरवाळतेय. वावडीचं डोकं तिच्या मांडीवर. ती थोपटतेय. म्हणतेय, 'हरिमुखे म्हणा। हरिमुखे म्हणा । पुण्याची गणना । कोण करी ॥ कापुराची वाती । उजळली ज्योती । ठायीच समाप्ती । झाली जैसी॥' ढोलकी पेटीच्या आवाजानं डोकं फाटू लागलं. असह्य होऊन तो ओरडू लागला. भानावर आला.

खुर्चीवर येशूगत तो बसलेला. समोर शून्य बीअर. निश्चल. डोक्यात काय काय शिरू लागलं. विचारांवरचा गेलेला ताबा. विचार. विचार. तीव्र. अफाट. जीवघेणं... हिंस्र... आदिम... भयाण... सूक्ष्म... फाटत गेलेला मेंदू... तडकलेल्या धमन्या... जाणिव-नेणिवेच्या पलिकडे गेलेला व्यवहार... नग्न फिरणारी माणसं... त्यांच्या लिंगाभोवती घोंघावणाऱ्या माशा... सडलेली शरीरं... कावळ्याचे लचके... गिधडांचा घेराव... भूक पोटात घेऊन फिरणारी, दारोदार हिंडणारी पोरं... माणसांनी तुंबलेल्या गटारी... वांतीचे समुद्र... दलदली... दारूबंदीची क्रांती... घरांच्या आधारखांबावरचे फलक... सोन्याची चेन घातलेले ढेरपोटे रेडे... त्यांच्या मागे धावणाऱ्या गोऱ्या गोमट्या म्हशी... हवालदिल शेतकरी... पावसाच्या थेंबाथेंबातून वरसणारी आग... त्या आगेवर शिजणारं घर... त्या घरात उकळणारे दोन जीव. अन् ती आग, निश्चल बसून पाहणारा एक ढासळलेला बुरूज. त्या बुरूजातून फुटलेला पीतरंगी धबधवा... रक्त... शेण... घाण... मूत्र... संज्ञेपलिकडचं जग... शिसाऱ्या अनंत शिसाऱ्या... वांत्या... उंद्री लागलेले केस... भुकेलं पोट... रेल्वे रूळ... हॉर्न... जगणं-मरणं... शून्य... 'ए नल्ले...' ... गावातल्या भिंती... नग्न म्हशीचे फोटो... डुकराची वरात... गटारीतून वाहणारा पू... कोंबड्याचा गलका... शेळीच्या मानेतून निघणारा हिरवा चिक... त्यावर घोंघावणाऱ्या माशा... तो चाटणारे कुत्रे... शेळीचा आक्रोश... जळणारं प्रेत...त्या प्रेतावर ओतलेली दारू... तोंडात पानाचा विडा... कानातला रुपया... नाकातला कापूस... तिरडीजवळचा अगरवत्तीचा उग्र दर्प... नाकाच्या झिणझिण्या... दगडाला फुटलेले पाझर... गावात निनादणारा हरिपाठाचा स्मशान सूर... त्या प्रेतावर शिलगावलेली सिगारेट... धुराची वलयं... आग... प्रचंड आग... एक दगडी महाकठीण अर्धवर्तुळ... टेकड्या... सोनवड्या... एक, दोन, तीन, चार, सात, सत्ताविस, तीस, शंभर, एकशे सत्याण्णव, पाचशे अकरा, न संपणारे हिशेब... खर्च... तंबाखू... गायछाप... चुनखडी... चुन्याच्या दलदली... खोबरगोळीची चव... भट्टीतला धूर... कंबरेवरच्या लाथा... थिजलेली गोठलेली शरीरं... शरीरावरच्या माशा... कुणीतरी हसतंय... रडतंय... भेकतंय... श्रापतंय... "तू... तुला सुख नाही. समाधान नाही. दुःख नाही. तू भ्रमिष्ट. एकटा. शून्य. तुझं जगणं उगाचंच. मरणं उगाचंच. तुझं असणंही उगाचंच... तू एक नाही. दोन नाही. दहा नाही. तू शून्य नाही. वजाही नाही. तू अपूर्णांक. तू हमाल. वेठविगार. इच्छामरणाचा तुला अधिकार नाही. तू भोगणार आहेस तुझं जगणं. जे तुला नेमून दिलंय... मारल्याचे वळ तुझ्या शरीरावर उमटणार नाहीत. म्हणून शरीरातल्या कळांचे संदर्भ तुला सापडणार नाहीत. तू मुक्त नाही. बद्ध नाही. तू शुद्ध नाही अन् तू बुद्धही नाही. दगड, धोंडे, किडे, कृमी, कीटक, शिदोड यांच्या पंक्तीत तुला बसवता येत नाही. तुझ्या जगण्याला अर्थ नाही. इथल्या योन्या तुझ्या अस्तित्त्वाबाहेरच्या. उद्ध्वस्ततेतून तू उद्ध्वस्त झालेला. जगण्याचं प्रयोजन हरवलेल्या अन् अलंकारहीन झालेल्या श्वासांचा तू हुंकार नाही. तू शून्यही नाही.





अनुक्रमणिका

घामानं तो चिंब झाला. हृदयाची धडधड प्रचंड वाढली. सर्व शरीराला कंप सुटला. हात, पाय, डोकं, मेंदू, डोळे, कान, नाक, बोटं, पोट, हृदय थरथरू लागलं, अंगावरचे शहारे जात नव्हते, शरीराचे कंप थांबत नव्हते. डोळ्यांसमोरच्या जळणाऱ्या चिता विझत नव्हत्या. विचार त्याच्या आवाक्याबाहेर गेले होते. सुचत नव्हतं. तो वाहून निघत होता. शरीराचा कणन्‌कण घामाच्या थेंबासोबत वाहून जातो की काय असंच त्याला वाटू लागलं. अन् न रहावून त्याने बीअर उचलली, तोंडाला लावली. अन् तो ग्लास एका दमात रिचवला. संपवून जमिनीवर जोरात आदळला. ग्लासाचे हजार तुकडे झाले घरभर काचा विखुरल्या. अन् क्षणात त्याच्या अंगात्र एक आग चालून आली. त्याच्या वापाचं प्रेत त्याच्या शरीरावर जळू लागलं. वावडी, 'नाही रे भाऊ. नको रे भाऊ', म्हणाली तरी त्याने तो उचलला. रिचवला. फोडला. तिचं प्रेत त्याच्या शरीरावर जळू लागलं रंध्रारंध्रातून आग शिरू लागली. तो पेटत गेला. शिलगत गेला. त्याला विझता येणार नव्हतं. हालचाल आता शक्य नव्हती. तो खिळ्यांनी सांधला गेला होता. शरीर दगडाचं झालं होतं. भावनाहीन. तरीही त्या दगडाच्या आत पेटत होती आग. प्रचंड आग. जिला धूर नव्हता. जी कधीच विझणारी नव्हती. त्याला विझवता येणार नव्हती.

❖❖❖

**संदीप कडू माळी**
३-अ, ललवाणी नगर, जळगाव रोड,
जामनेर, जि. जळगाव-४२४२०६.
संपर्क : ९४२१५२१८८५

कथा स्पर्धा-प्रौढ गट-प्रथम क्रमांक

# सत्यकथा

विनय फाटक

**दैनिक पहाट तारीख ५ जुलै २०१५ :**

विशेष वृत्त- ३ जून १९०८ रोजी सकाळी सव्वासातच्या सुमारास सैबेरियातील तुंगास्का नदीच्या दक्षिणेकडील कास्नोयास्क या प्रांतामधे राहाणाऱ्या तुंगास जमातीच्या लोकांना आकाशातून एक निळ्यापांढऱ्या रंगाचा तेजस्वी पट्टा सरकताना दिसला. सूर्यापेक्षा तेजस्वी असलेला तो पट्टा क्षणार्धात दिसेनासा झाला आणि लगेचच कानठळ्या बसणारे अनेक स्फोट झाले. या स्फोटांमुळे सहा कोटी झाडे क्षणार्धात बेचिराख झाली. १०० किलोमीटरपेक्षा दूर असणाऱ्या आदिवासींच्या झोपड्या आणि तंबू आकाशात उंच उडून दूरवर पडले. या स्फोटांमुळे रेनडिअरचे हजारो कळप मृत्युमुखी पडले. हे स्फोट हिरोशिमातील बॉम्बस्फोटांपेक्षा एक हजार पट तीव्र होते. १९२० च्या दशकापासून या स्फोटांचे कारण शोधण्याचे संशोधन सुरू आहे. आकाशात संचार करणाऱ्या धुमकेतूची पृथ्वीशी टक्कर झाल्यामुळे हा स्फोट झाला असे वैज्ञानिकांच्या संशोधनातून निष्पन्न झाले आहे.

१९०८ च्या या घटनेनंतर झालेल्या संशोधनामुळे अवकाशात वावरणाऱ्या लघुग्रहांचा व धुमकेतूंचा अभ्यास शास्त्रज्ञांनी सुरू केला आहे. आपल्या पृथ्वीला अंतराळातून धोका उत्पन्न होऊ शकतो व तो जीवघेणा ठरू शकतो; या जाणिवेमुळे शास्त्रज्ञ आकाशावर करडी नजर ठेवून आहेत.

अलीकडेच शास्त्रज्ञांच्या लक्षात आले आहे की पृथ्वीपासून लाखो मैल अंतरावरून एक धुमकेतू पृथ्वीच्या दिशेने वाटचाल करत आहे. या धुमकेतूच्या प्रवासाचा वेग लक्षात घेता, दोन वर्षांनंतर, म्हणजे २०१७ सालाच्या जुलै महिन्यात तो पृथ्वीवर आदळणार आहे. १९०८ साली सैबेरियावर आदळलेल्या धुमकेतूपेक्षा हा धुमकेतू हजारपट मोठा आहे. जुलै २०१७ मधे जेव्हा तो पृथ्वीवर आदळेल तेव्हा पृथ्वीचे एखाद्या भट्टीमधे रूपांतर होईल. पृथ्वीवरील झाडे, प्राणी आणि माणसांची क्षणार्धात राख होईल. वादळी वाऱ्याच्या झोतामुळे इमारती व घरं पत्त्याच्या बंगल्यासारखे कोसळतील. या प्रचंड उत्पातामुळे लागलेली आग विझवण्यासाठी व कोसळलेल्या बांधकामाचे ढिगारे दूर करण्यासाठी एकही माणूस जिवंत राहणार नाही. आणि चुकून जर कोणी जिवंत राहिला तर त्याची अवस्था काय होईल त्याची कल्पना करणं कठीण आहे.

पृथ्वीच्या दिशेने वाटचाल करणाऱ्या या धुमकेतूचा शोध व त्याच्या अजस्र आणि विध्वंसक स्वरूपाची नेमकी कल्पना शास्त्रज्ञांना सहा महिन्यांपूर्वी जाणवली. या सहा महिन्यांच्या काळात शास्त्रज्ञांपासून त्यांच्या देशांच्या प्रमुखांपर्यंतचा या बातमीचा उलटसुलट प्रवास, खरेपणाची उलटतपासणी, खात्री, ती जाहीर केल्यानंतर होणारे संभाव्य परिणाम वगैरे सर्व बाबींवर चर्चा व विचार पूर्ण झाल्यावर आज ही बातमी अधिकृतपणे जगातल्या सर्वांसाठी प्रसिद्ध केली जात आहे. ही बातमी कळल्यानंतर लोकांमध्ये घबराट निर्माण होईल याची कल्पना आहे; पण भविष्यात येऊ घातलेल्या एका गंभीर संकटाची सर्वांना कल्पना असणं आवश्यक आहे. शिवाय या होऊ घातलेल्या घटनेच्या संदर्भात कोणत्याही प्रकारच्या अफवा पसरवल्या जाऊ नयेत म्हणून ही बातमी प्रकाशित केली जात आहे. या संभाव्य घटनेमुळे एक बाब स्पष्ट होते की, पृथ्वीवासीय स्वतःला संरक्षित समजत असतील तर ते चुकीचे आहे. माणसांनी कितीही प्रगती केली तरी निसर्गावर मात करणं माणसाला अजूनही शक्य झालं नाही. लवकरच होणाऱ्या, जगातल्या सर्व राष्ट्रप्रमुखांच्या परिषदेमधे या गंभीर विषयावर चर्चा होण्याची शक्यता आहे.

**दैनिक पहाट. तारीख १० जुलै २०१५ :**

धुमकेतूच्या पृथ्वीशी होऊ घातलेल्या टक्करीमुळे शेअरबाजार आज पूर्णपणे कोसळला. या धुमकेतूच्या कल्पनेनेच कित्येकांनी घाबरून प्राण सोडले. साधारण एक वर्ष व त्यापुढच्या दीर्घ पल्ल्याच्या सर्व क्षेत्रातल्या योजना आता बंद झाल्या आहेत. नवीन खरेदी करण्यास शेअरबाजारामधे कोणीही उत्सुक नाही. त्यामुळे शेअरबाजार पूर्णपणे कोसळला आहे. धुमकेतूच्या





अनुक्रमणिका



**विनय फाटक**

*किर्लोस्कर ऑईल इंजिन्सच्या अर्थखात्यामध्ये नोकरी. शिक्षण - बी.कॉम., एल.एल.बी. वय - ५३ वर्षे.*

*आजपर्यंत खालील मासिकांमध्ये कथा किंवा एकांकिका प्रसिद्ध झाल्या आहेत.*

*माहेर, मेनका, प्रपंच मध्ये प्रत्येकी एक कथा.*

*साप्ताहिक सकाळमध्ये दोन कथा. त्यापैकी एका कथेला कथास्पर्धेमध्ये पाचवा क्रमांक.*

*विपुलश्रीमध्ये तीन कथा. त्यापैकी एका कथेला स्पर्धेमध्ये उत्तेजनार्थ बक्षिस.*

*दक्षताच्या स्पर्धेमध्ये एका कथेला दुसरा क्रमांक. उत्तमकथा मध्ये दोन कथा. यापैकी एका कथेला स्पर्धेमध्ये पहिला क्रमांक.*

*लोकमतच्या दिवाळी अंकामध्ये एक एकांकिका. श्रमविश्व या वार्षिकामध्ये एक एकांकिका.*

*महाराष्ट्राची जत्रा या दिवाळी अंकामध्ये एक कथा. 'टिंकल' या लहान मुलांच्या इंग्रजी मासिकात दोन कथा.*

---

संभाव्य टकरीचा जगाच्या अर्थकारणावर खूप मोठा परिणाम झाला आहे. जगातले अर्थशास्त्रज्ञ याचा अभ्यास करून उपाय सुचवतील अशी अपेक्षा आहे.

**दैनिक पहाट. तारीख २५ जुलै २०१५ :**

धुमकेतूच्या पृथ्वीशी होणाऱ्या टकरीवर, जगातल्या सर्व राष्ट्रप्रमुखांच्या परिषदेमधे आज सखोल चर्चा झाली. केवळ या विषयावर चर्चा करण्यासाठी व आवश्यक कृती करण्यासाठी डिसेंबर २०१५ मधे होणारी राष्ट्रप्रमुखांची पूर्वनियोजित बैठक पाच महिने आधी घेण्यात आली. या धुमकेतूवर नजर ठेवण्यासाठी व त्याचा अभ्यास करण्यासाठी एक संयुक्त यंत्रणा स्थापन करण्यात आली आहे. दरम्यानच्या काळात जगभर सलोख्याचे वातावरण राहण्यासाठी कोणताही देश दुसऱ्या देशावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरित्या हल्ला करणार नाही; असे एकमताने ठरले आहे. जगामधे ज्या देशांमधे सध्या युद्ध असेल तिथे ते ताबडतोब बंद करण्याचे आदेश दिले आहेत.

**दैनिक पहाट. तारीख ११ ऑगस्ट २०१५ :**

जगातील बांधकाम व्यवसाय पूर्णपणे बंद होण्याच्या मार्गावर आहे. जुलै २०१५ पूर्वी सुरू झालेली व जवळजवळ पूर्ण होत आलेली बांधकामे सोडली तर एकही नवे बांधकाम जुलैनंतर सुरू झालेले नाही. याचा परिणाम सिमेंट, विटा, लाकूड वगैरे वस्तूंच्या व्यवसायावर झालेला आहे. बांधकाम मजूर, अभियंते, वास्तुरचनाकार वगैरे व्यावसायिकांवर बेकारीचे संकट आले आहे. बांधकाम क्षेत्राशी संबंध असलेले रंग, फरशा, काचा, चुना, फर्निचर वगैरे वस्तूंची मागणी एकदम कमी झाली आहे. बांधकाम व्यवसायातील मंदीचा परिणाम प्रत्येक देशातल्या व पर्यायाने जगाच्या अर्थव्यवस्थेवर होऊ लागला आहे. शेअरबाजार कोसळल्यानंतर अर्थव्यवस्थेवर आलेले हे दुसरे संकट आहे.

**दैनिक पहाट. तारीख ३० सप्टेंबर २०१५ :**

२०१७ साली पृथ्वीवर धडकू घातलेल्या धुमकेतूच्या भीतीदायक पार्श्वभूमीवर विरोधाभासाची घटना घडत आहे. सप्टेंबर २०१५ या महिन्यापासून जगभर जणू काही लग्नसराई सुरू झाली आहे. नेहमीपेक्षा तिप्पट लग्ने या महिन्यात झाली आहेत. भारतासारख्या देशांमधे जिथे मुहूर्त पाहून लग्न करतात तिथेसुद्धा या महिन्यात मुहूर्त नसताना बरीच लग्ने झाली आहेत लग्नाच्या पाठोपाठ पर्यटन व्यवसायसुद्धा जोरात आहे. केवळ मधुचंद्रासाठी नाही तर सर्व वयाच्या पर्यटकांनी प्रवास सुरू केला आहे.

**दैनिक पहाट. तारीख १५ ऑक्टोबर २०१५ :**

गेल्या दोन महिन्यांपून धार्मिक ठिकाणांची व तीर्थक्षेत्रांची गर्दी वाढत आहे. २०१७ साली पृथ्वीवर धडकू घातलेल्या धुमकेतूच्या भीतीमुळे बुवाबाजीचा धंदा भरभराटीला आला आहे. गंडे, दोरे, ग्रहांचे खडे, ग्रहांच्या शांती, कालसर्प योग, नारायण नागबळी, मृत्युंजय मंत्राचा जप वगैरे प्रकारांची चलती वाढली आहे. या चलतीमुळे ज्योतिषी, बुवा, पुरोहित, मांत्रिक वगैरे मंडळी हात धुवून घेत आहेत. शेअरबाजार कोसळल्यामुळे व बांधकाम व्यवसाय बंद पडल्यामुळे आलेली मंदी तर पर्यटन, लग्न व धार्मिक क्षेत्रात आलेली

तेजी अशी संमिश्र अर्थव्यवस्था जगभर दिसत आहे.

**दैनिक पहाट. तारीख २७ डिसेंबर २०१५ :**

प्रत्येक वर्षाच्या शेवटच्या आठवड्यात संपत आलेल्या वर्षाचा आढावा घेण्याची सर्वच वर्तमानपत्रांची पद्धत आहे. दैनिक पहाटचासुद्धा त्याला अपवाद नाही. या वर्षातला हा शेवटचा रविवार दैनिक पहाटच्या वाचकांसाठी चित्रपट, नाटक, खेळ, राजकारण व इतर सर्व क्षेत्रातील वर्षभरातल्या घडामोडींचा आढावा त्या त्या क्षेत्रातील तज्ज्ञांच्या सिद्धहस्त लेखणीतून घेऊन आला आहे.

२०१७ साली पृथ्वीवर आदळू घातलेल्या धुमकेतूची भीती गेल्या सहा महिन्यांपासून संपूर्ण जगाला ग्रासून राहिली आहे. साहजिकच प्रत्येक क्षेत्रावर या संभाव्य घटनेचे बरेवाईट परिणाम होत आहेत. खेळांच्या बाबतीमधे ऑलिंपिकसाठी तयारी करणे हा प्रत्येक खेळाडूच्या कारकीर्दीचा महत्त्वाचा भाग असतो. पण आता २०१७ नंतरच्या आयुष्याची कोणालाच खात्री वाटत नाही त्यामुळे ऑलिंपिकचा विचार सध्या संपल्यात जमा आहे. चित्रपटातल्या नटनट्यांच्या पुढील तीनचार वर्षांच्या तारखा राखीव असतात; पण आता २०१६च्या पुढील सगळ्या तारखा मोकळ्या आहेत. राजकारणाच्या बाबतीतही निवडणुका, मंत्रीपदांच्या नेमणुका किंवा कोणताही नवा उपक्रम सुरू करण्यास कोणताही राजकीय पक्ष उत्सुक नाही.

सप्टेंबर महिन्यापासून लग्नांची संख्या वाढली आहे व त्याबरोबरच कुटुंबनियोजनाच्या साधनांचा खपसुद्धा प्रचंड वाढला आहे. कोणत्याही जोडप्याला मूल होऊ देण्याची इच्छा नसल्यामुळे स्वेच्छाकुटुंबनियोजनाचा कार्यक्रम सुरू झाला आहे. हे असंच सुरू राहिलं तर अजून चार महिन्यानंतर म्हणजे एप्रिल २०१६ नंतर जगामधे एकही मूल जन्माला येण्याची शक्यता नाही.

जगाची लोकसंख्या सध्या सातशे कोटीच्या आसपास आहे. रोज ही संख्या साधारणपणे तीन लाखाने वाढते. धुमकेतूच्या बातमीमुळे बऱ्याचजणांनी घाबरून प्राण सोडले. काहींनी निराशेमुळे आत्महत्या केल्या, त्यामुळे लोकसंख्यावाढीचा दर कमी झाला आहे. एप्रिल २०१६ नंतर हा दर आणखी कमी होणार आहे.

कर्करोग, एड्स व तत्सम प्रकारच्या जीवघेण्या रोगांचे रुग्ण थोडेसे सुखावले आहेत; कारण धुमकेतूच्या टकरीमुळे त्यांच्या यातना कायमच्या संपणार आहेत. शिवाय आपल्यावरोवर इतर सर्व निरोगी लोकसुद्धा मरणार आहेत; ही कल्पनासुद्धा त्यांना सुखावणारी आहे.

धुमकेतूच्या होऊ घातलेल्या धडकेपासून जिवंत राहण्यासाठी काही श्रीमंत लोकांनी जमिनीखाली खोल भुयारे बांधून त्यामधे सर्व प्रकारच्या सोयी केल्या आहेत अशा अफवा आहेत. या केवळ अफवाच असाव्यात कारण धडकेनंतर कोणतीही भुयारे सुरक्षित राहाणार नाहीत. एकतर ती उघडी पडतील; किंवा पूर्णपणे गाडली जातील.

साऱ्या जगापुढे आता एकच प्रश्न आहे की २०१७ साली जेव्हा धुमकेतू पृथ्वीवर आपटेल त्यानंतर पृथ्वीचं आणि मानवजमातीचं भवितव्य काय असेल ? या प्रश्नाचं उत्तर कोणाकडेच नाही. तरीसुद्धा सर्वजण एका महापुरुषाकडे आशेने पहात आहेत. त्या महापुरुषाचं नाव आहे श्रीकिरण. जगातल्या बऱ्याच देशांमधे श्रीकिरण याची ध्यान, योग, अध्यात्म या विषयांना वाहिलेली केंद्रे आहेत. साऱ्या जगभर त्यांचे शिष्य व अनुयायी पसरले आहेत. २ जुलै २०१५ पासून, म्हणजे धुमकेतू पृथ्वीवर आदळणार आहे ही बातमी प्रसिद्ध होण्याच्या आधी तीन दिवस, श्रीकिरणनी अचानक मौनव्रत सुरू केले आहे. त्यांच्या या मौनव्रताचा आणि धुमकेतूच्या बातमीचा एकमेकाशी संबंध आहे; असे त्यांचे अनुयायी व भक्त मानतात. मौनव्रत धारण केलेले श्रीकिरण क्वचितच व खुणेद्वारे किंवा लिहून आपल्या शिष्यांशी संपर्क साधतात. या संपर्कानुसार १ जानेवारी २०१६ श्रीकिरण मौनव्रत सोडून संपूर्ण जगाला मार्गदर्शन करणार आहेत; असे त्यांच्या 'विश्वघर' या संस्थेतर्फे जाहीर करण्यात आले आहे. ही बातमी प्रसिद्ध झाल्यापासून संपूर्ण जगाचे लक्ष १ जानेवारीला श्रीकिरण काय बोलतात, याकडे लागले आहे. देवनगरमधील श्रीकिरण यांच्या आश्रमाकडे जाणाऱ्या सर्व प्रवासी मार्गांची ३० व ३१ डिसेंबरची आरक्षणे केव्हाच संपली आहेत. श्रीकिरण याचं भाषण जगातल्या सर्व दूरचित्रवाणीच्या व आकाशवाणीच्या केंद्रांवरून प्रसारित होणार आहे. तरीसुद्धा कित्येकांना ते प्रत्यक्ष ऐकण्याची इच्छा आहे, त्यामुळे देवनगरमधील त्यांच्या आश्रमाला एका मोठ्या जत्रेचं स्वरूप येणार

आहे. येणारं नवीन वर्ष श्रीकिरण यांच्या मार्गदर्शनामुळे खूप चांगलं, भरभराटीचं व शुभदायक जावं, अशी इच्छा व्यक्त करणं एवढंच सध्या आपल्या हातात आहे.

**दैनिक पहाट. २ जानेवारी २०१६ :**

देवनगरमधे झालेलं श्रीकिरण यांचं भाषण काल साऱ्या जगाने जीवाचे कान करून ऐकलं. त्यांच्या भाषणाच्या खूप आधीपासूनच विश्वघर या त्यांच्या संस्थेच्या आवारामधे प्रचंड गर्दी जमली होती. संस्थेच्या आवाराबाहेरचे रस्ते गर्दीने फुलले होते. साऱ्या जगभरातल्या चित्रवाहिन्यांचे प्रतिनिधी आपल्या यंत्रसामुग्रीसह श्रीकिरणं यांचे भाषण टिपण्यासाठी सज्ज झाले होते. सकाळी दहा वाजता श्रीकिरण व्यासपीठावर आले; तसा सगळा जनसमुदाय एकदम शांत झाला; आणि आपापले श्वास रोखून श्रीकिरण यांच्या बोलण्याची वाट पाहू लागला. श्रीकिरण यांचे भाषण सुरू झाले; त्यावेळी जगातले सर्व व्यवहार तात्पुरते थांबले होते, जगभरचे रस्ते ओस पडले होते. हा एक जागतिक विक्रम असावा; पण सध्या कोणीही विक्रम करण्याच्या किंवा तो नोंदण्याच्या मनस्थितीत नाही.

'सत्य आणि केवळ सत्यच यापुढे जगाला तारू शकेल. आजपर्यंत केलेल्या पापांची, खोट्या कृत्यांची कबुली द्या, परतफेड करा; आणि प्रायश्चित घ्या; म्हणजे तुम्हाला धुमकेतूची भीती उरणार नाही.' असा संदेश आपल्या छोट्याशा भाषणाद्वारे श्रीकिरणनी दिला.

ज्या देशातल्या बँका गोपनीयतेच्या कायद्याची पळवाट काढून काळा पैसा आपल्याकडे ठेवून घेतात; त्या देशाला धुमकेतूची जास्त भीती आहे, असे ते प्रसारमाध्यमांच्या एका प्रश्नाला उत्तर देताना म्हणाले. सर्व देशांनी काळा पैसा जाहीर करण्यासाठी, गुन्हे कबूल करण्यासाठी स्वेच्छा योजना राबवाव्यात; असेही ते म्हणाले.

आपल्या भाषणाचा समारोप करताना ते म्हणाले की या जगातून असत्य जेवढे दूर होईल; तेवढी धुमकेतूची तीव्रता कमी होईल. धुमकेतूचा धोका खोटे बोलणाऱ्यांना व खोटे वागणाऱ्यांना आहे.

त्यांच्या भाषणानंतर, जमलेल्या लाखो लोकांनी श्रीकिरण यांच्या नावाचा जयजयकार केला व 'सत्यमेव जयते' अशा घोषणा दिल्या.

**दैनिक पहाट. १० जानेवारी २०१६ :**

स्वित्झर्लंडने आपल्या देशातील बँकांमधल्या खात्यांच्या माहितीबद्दलचा गोपनीयतेचा कायदा रद्द केला आहे. यापुढे कोणत्याही देशातल्या सरकारला स्वित्झर्लंडमधील बँकांमधल्या कोणत्याही खात्याची माहिती त्वरित मिळू शकेल असे जाहीर केले आहे. स्वित्झर्लंडमधील नागरिकांच्या दबावामुळे स्वित्झर्लंड सरकारने हा निर्णय तडकाफडकी घेतला आहे. या निर्णयामुळे जगातला बराचसा काळा पैसा बाहेर येण्याची शक्यता आहे.

**दैनिक पहाट. १७ जानेवारी २०१६ :**

जगातल्या जवळजवळ सर्व देशांच्या सरकारांनी काळा पैसा व सर्व प्रकारचे गुन्हे स्वेच्छेने जाहीर करण्याच्या योजना सुरू केल्या आहेत. या योजनेप्रमाणे जे काळा पैसा उघड करतील; किंवा गुन्हे कबूल करतील, त्यांच्या दंडामधे किंवा शिक्षेमधे थोडी सूट मिळणार आहे. या योजनांना जगभर खूप मोठा प्रतिसाद मिळत आहे. भारतामधे या योजनेअंतर्गत आतापर्यंत पन्नास हजार कोटी रुपयांचा काळा पैसा जाहीर झाला आहे आणि हा आकडा रोज वाढत आहे.

**दैनिक पहाट. ३१ जानेवारी २०१६ :**

श्रीकिरणनी जगाला केलेल्या मार्गदर्शनानंतर जगभर सत्ययुगाची सुरुवात झाली आहे. न्यायालयांमधे नवीन खटले दाखल होणं बंद झालं आहे. चोऱ्या, खून, दरोडे, बलात्कार व सर्व प्रकारचे आर्थिक गुन्हे पूर्णपणे थांबले आहेत. जगभरातल्या न्यायालयांमधून नव्वद टक्के खटले दावेदारांकडून मागे घेण्यात आले आहेत. यातील पन्नास टक्के खटले दावेदारांकडून स्वेच्छेने मागे घेण्यात आले आहेत व चाळीस टक्के खटल्यांमधल्या विरुद्ध पक्षांनी आपल्या चुका कबूल करून योग्य भरपाई दिली आहे. उरलेल्या दहा टक्के खटल्यांच्या बाबतीत न्यायालयाबाहेर तडजोड करण्याची प्रक्रिया सुरू झाली आहे. फौजदारी गुन्ह्यांच्या खटल्यामधील सत्तर टक्के आरोपींनी आपले गुन्हे कबूल केले आहेत व उरलेल्या तीस टक्के खटल्यांमधे पोलिसांनी आरोप मागे घेतले आहेत.

**दैनिक पहाट. १० मार्च २०१६ :**

गेल्या दोन महिन्यांपासून भेसळ करण्याचे प्रकार



अनुक्रमणिका

पूर्णपणे बंद पडले आहेत. भेसळ करणाऱ्या ज्या गुन्हेगारांवर खटले भरले होते. त्या सर्व गुन्हेगारांनी गुन्हा कबूल केल्यामुळे त्यांची तुरुंगांमधे रवानगी झाली आहे. नवीन गुन्हे करण्याची आता कोणाचीही इच्छा नाही; हे त्यामागचे कारण आहे. यामुळे भेसळ प्रतिबंधक खात्याचे काम आता खूपच सोपे झाले आहे.

**दैनिक पहाट. ३ मे २०१६ :**

सर्व सरकारी कार्यालयांमधली कामकाजाची पद्धत आता आमूलाग्र बदलली आहे. सरकारी कार्यालयातली सर्व कामे आता नियमाप्रमाणे व लांच न घेता होऊ लागली आहेत. जगातले सगळेच आर्थिक व्यवहार आता कोणत्याही प्रकारच्या लांचेशिवाय सुरळीतपणे होऊ लागले आहेत. या स्वच्छ व्यवहारांमुळे जगातील अर्थव्यवस्थेवरचा ताण एकदम कमी झाला आहे.

**दैनिक पहाट. १५ जून २०१६ :**

जगाची लोकसंख्या वाढणं आता पूर्णपणे थांबलं आहे. मे २०१६ पासून जन्माला येणाऱ्या बालकांची संख्या शून्यावर आली आहे. धुमकेतूच्या भीतीमुळे सुरू झालेल्या स्वेच्छाकुटुंबनियोजनाच्या कार्यक्रमामुळे जगाची लोकसंख्या साधारणपणे दोन कोटीने कमी झाली आहे. जगभरातील प्रसुतीगृहे आता रिकामी होऊ लागली आहेत व त्या प्रसुतीगृहांमधील डॉक्टर व परिचारिका वेकार होऊ लागल्या आहेत.

**दैनिक पहाट. ३ जुलै २०१६ :**

१ जानेवारी २०१६ नंतर जगातल्या ज्या ज्या देशांमधे निवडणुका झाल्या आहेत, त्यापैकी काही मोजके अपवाद वगळता सर्व निवडणुका बिनविरोध झाल्या आहेत. जगात सत्ययुगाची सुरुवात झाल्यामुळे खोटी आश्वासने व प्रलोभने दाखवण्याचे कोणीही उमेदवाराला कारण उरले नाही. सर्व राजकीय पक्षांचा कार्यक्रम एकच आहे व तो केवळ सत्यावर आधारित आहे; त्यामुळे एकमेकांशी स्पर्धा करण्याची किंवा राजकीय आकांक्षा बाळगण्याची कोणालाही गरज वाटत नाही.

**दैनिक पहाट. २५ डिसेंबर २०१६ :**

संपत आलेल्या २०१६ या वर्षाचा आढावा घेताना दोन महत्त्वाच्या घटनांचा उल्लेख करणं आवश्यक आहे. पहिली होऊ घातलेली घटना म्हणजे २०१७ जुलैमधे धुमकेतूची पृथ्वीशी होणारी टक्कर आणि दुसरी घटना म्हणजे श्रीकिरणनी पृथ्वीला या धुमकेतूपासून वाचवण्याचा सांगितलेला उपाय. श्रीकिरण यांच्या मार्गदर्शनामुळे या जगामधे सत्ययुग अवतरलं आहे व सर्व प्रकारच्या व्यवहारांमधे आमूलाग्र बदल झाला आहे.

श्रीकिरण यांच्या भाषणानंतर जगभर एक उत्साहाचं वातावरण निर्माण झालं; पण काहींच्या बाबतीत याचा उलटा परिणाम झाला. गुन्हे न करता पैसे मिळवण्याची, लांच न खाता काम करण्याची कल्पना ज्यांना सहन होत नव्हती अशा कित्येकांनी आत्महत्या केल्या. त्यामधे अतिरेकी, तस्कर, भेसळ करणारे, आर्थिक गुन्हेगार, सरकारी नोकर असे वेगवेगळ्या प्रकारचे लोक होते. यापैकी कोणी वीष खाऊन, कोणी गळफास लावून, कोणी स्वतःला गोळी घालून घेऊन, कोणी उंच इमारतीवरून उडी मारून मेले. काहींच्या तर खरं बोलण्याच्या नुसत्या कल्पनेमुळेच हृदयक्रिया बंद





अनुक्रमणिका

पडल्या. पण ही परिस्थिती हळूहळू बदलली. काळ्या पैशाची, खोटे बोलण्याची, खोटे वागण्याची सूज निघून गेली; आणि जग निर्मळ व स्वच्छ होऊ लागलं आहे. खरेपणा तर इतका वाढला आहे की, प्रत्येकजण आपला दिलेला शब्द कोणत्याही परिस्थितीत पूर्ण करू लागला आहे. कोणत्याही प्रकारचे वाद आता सुरू झाल्याक्षणीच मिटू लागले आहेत. जगभर सलोख्याचं वातावरण निर्माण झाल्यामुळे राग, लोभ, मत्सर, हेवेदावे, ईर्षा, अनावश्यक स्पर्धा वगैरे वाईट प्रवृत्ती नष्ट झाल्या आहेत. न्यायालयांना व पोलिसांना आता काहीच काम उरलं नाही. वाहतूक नियंत्रण करण्यासाठीसुद्धा आता पोलिसांची गरज पडत नाही. वाहतूक नियंत्रण करणारा तांबडा दिवा बदलून हिरवा दिवा लागल्याशिवाय कोणीही रस्ता ओलांडत नाही. भारतासारख्या देशांमधे रस्त्यावर साजरे होणारे नवरात्र किंवा गणेशचतुर्थीसारखे उत्सव अता जवळजवळ बंद पडले आहेत. कारण देवाच्या नावाखाली पैसे गोळा करणे, ध्वनिवर्धक लावून धांगडधिंगा करणे, मिरवणुका काढणे यातला खोटेपणा सर्वांनाच जाणवू लागला आहे.

पण जुलै २०१७ मधे पृथ्वीवर धडकू घातलेल्या धुमकेतूची धास्ती अजून सर्वांच्या मनात आहे. जगामधील हा खरेपणा असाच कायम रहावा, आणि धुमकेतूने आपला मार्ग बदलून पृथ्वीपासून दूर कोठेतरी निघून जावे, अशी प्रार्थना करतो व येणारे २०१७ हे वर्ष सर्वांना आनंदाचे, भरभराटीचे व दीर्घायुष्याचे जावो; अशी इच्छा करून २०१६ या वर्षाचा आढावा संपवतो.

**दैनिक पहाट. २ जानेवारी २०१७ :**

श्रीकिरण यांनी देवनगरमधील आपल्या विश्वघर या आश्रमामधे अचानकपणे पत्रकार परिषद घेऊन एक नवीन संकल्पना मांडली.

संपूर्ण जग हा एकच देश असावा. या देशामधे लोकशाही असावी व आर्थिक व्यवहारासाठी एकच चलन असावे अशी ही संकल्पना आहे. जगरूपी या देशाला कोणत्याही प्रकारच्या संरक्षण दलाची आवश्यकता असणार नाही, असेही ते म्हणाले. श्रीकिरण यांच्या या संकल्पनेचे जगभर प्रचंड स्वागत होत आहे.

**दैनिक पहाट. ७ ऑगस्ट २०१७ :**

जुलै महिना संपून गेला तरी धुमकेतूबद्दलची कोणतीही अधिकृत माहिती सर्व देशांच्या संयुक्त यंत्रणेमार्फत प्रसारित करण्यात आलेली नाही. धुमकेतूच्या धडकेच्या शक्यतेमुळे संपूर्ण जुलै महिना जगभर भीतीचं वातावरण होतं. याबद्दल श्रीकिरण यांच्याकडे विचारणा केली असता 'धुमकेतूचा विचार करू नका, केवळ सत्य वोला. सत्य वागा व सत्य जगा' असा संदेश श्रीकिरण यांनी दिला आहे. दरम्यान 'एक जग-एक देश' या संकल्पनेच्या अंमलबजावणीची तयारी सुरू आहे. ही संकल्पना प्रत्यक्षात येण्यासाठी खूप काम करावे लागणार आहे; याची सर्वच देशांना कल्पना आहे.

०००

धुमकेतूवर लक्ष ठेवून असलेल्या सर्व देशांच्या संयुक्त यंत्रणेचे तीन शास्त्रज्ञ, देवनगरमधील विश्वघर या संस्थेमधे श्रीकिरण यांच्यासमोर बसले होते. त्या चौघाव्यतिरिक्त तिथं आणखी कोणीही नवहतं.

"धुमकेतूने आपला मार्ग बदलला आहे हे लोकांना कळू द्या. त्यानंतर कसं वागायचं हे लोकांनाच ठरवू द्या. धुमकेतूची खरी स्थिती लपवून ठेवणं; हासुद्धा एक प्रकारचा खोटेपणाच आहे..."

"पण ती एक जग एक देश ही संकल्पना अमलात येईपर्यंत तरी..." तिघांपैकी एक शास्त्रज्ञ श्रीकिरण यांचं वाक्य पूर्ण होण्यापूर्वी बोलू लागले पण श्रीकिरणनी त्यांना थांबवलं.

"धुमकेतूची भीती नसताना माणसांना खरं बोलण्याची सवय झाली पाहिजे; आणि त्याची कधीतरी सुरुवात झाली पाहिजे. आज एका धुमकेतूने मार्ग बदलला आहे. आकाशगंगेमधे असे कितीतरी धुमकेतू आहेत. उद्याचं काही सांगता येत नाही..." बोलताबोलता श्रीकिरण थांबले.

तिघेही शास्त्रज्ञ यावर एकमेकांकडे पाहू लागले.

❖❖❖

**विनय फाटक**
४ शिवतीर्थ सोसायटी, ४० एरंडवणा,
पौड फाट्याजवळ, पुणे - ४११ ०३८.
दूरभाष : २५४६३७६६







## खरं सांगायचं म्हणजे...

गंगाधर गाडगीळ

खरं सांगायचं म्हणजे...

विद्वान वक्त्यांनी हातांनी भोपळा सूचित करीत म्हटले, "To put it in a nutshell..."

त्याच वेळी मी दचकून जागा झालो; आणि मग एक धाडसी गोष्ट केली. मी खिशातून एक शेंग काढली. तिच्यातला दाणा खाऊन टाकला. मग सरळ स्टेजवर जाऊन विद्वान वक्त्यांना त्यांचे भाषण चालू असतानाच त्या पोकळ शेंगेत कोंबले व शेंग खिशात टाकून बाहेर पडलो.

गंमत अशी की, श्रोत्यांना काय होतेय ते समजलेच नाही. ते आपले व्यासपीठाकडे पाहात भाषण चालूच आहे अशा समजुतीने बसलेले होते.

बाहेर पडल्यावर मी माझ्या घरासमोरच्या बगिच्यात खिशातल्या चाकूने एक लहान खड्डा केला. त्यात ती शेंग पुरून टाकली, आणि मग हात झाडीत चालायला लागलो. ह्यामुळे त्या वक्त्यांना जरा गुदमरल्यासारखे वाटणे शक्य होते. पण लांबलचक भाषणे करायची हौस असेल तर मनुष्याने प्रसंगोपात्त असली गैरसोय सोसायला तयार असले पाहिजे.

मी केलेल्या धाडसाबद्दल आपल्याला आश्चर्य वाटत असेल. पण ह्या गोष्टी माझ्या अंगवळणी पडलेल्या आहेत. कारण वक्त्यांना पळवायची माझी ही सवय फार जुनी आहे. मूठ आपटून जडजंबाल बडबडणाऱ्या एका वक्त्याची मूठ मी अशीच फार दिवसांपूर्वी लांबवली आहे. सध्या माझ्या टेबलावर पेपरवेट म्हणून मी तिचा उपयोग करतो. त्याचप्रमाणे एका किडकिडीत क्रांतिकारक वक्त्याच्या डोक्यावर मी भाषण चालू असताना माझे पेन्सिलीचे टोपण लावले आणि त्यांना खिशात अडकवून घरी घेऊन आलो. आज अनेक वर्षे मी त्यांचा लाल पेन्सिल म्हणून उपयोग करीत आलो आहे. मी पेपर तपासल्यावर बरीच मुले नापास होतात ह्याचे कारण ती लाल पेन्सिलच !

सध्या माझ्या बायकोला एका मोरांब्याच्या वरणीची आवश्यकता आहे. त्यामुळे मी गोड गोड भावगीते म्हणणाऱ्या एखाद्या गायिकेच्या शोधात आहे. अशी एखादी ठेंगू, लठ्ठशी गायिका कुठे आढळल्यास कृपा करून मला तावडतोब कळवावे.

असाच एकदा मी 'मुस्कराहट' नावाचा सिनेमा पाहायला गेलो. तो जंगल-चित्रपट असावा अशी माझी कल्पना ! ब्रह्मपुत्रा नदीतल्या मगरीला मुस्कराहट म्हणतात हे सगळ्यांना माहीत आहे. माझ्या बायकोला अर्थात हे माहीत नाही. ती मुस्कराहट म्हणजे बंगाली पट्टेवाला वाघ असे समजते. बराच वेळ चित्रपट पाहिला तरी त्यात ब्रह्मपुत्रा नदीतील मगर दिसेना, अगर बंगाली पट्टेवाला वाघदेखील दिसेना. तसा मी संतापलो. जाग्यावरून उठत मी संतापाने म्हटले, "ह्याचा जाव विचारलाच पाहिजे !" बायको 'अहो, अहो' म्हणून मला अडवू लागली. पण मी ताडकन् उडी मारून पडद्यावर गेलो; आणि सिनेमाच्या नायकाच्या हनुवटीवर ठोसा मारून त्याला खाली पाडले. नंतर झाडूने एका कागदाच्या तुकड्यावर त्याला ढकलले आणि त्या कागदाची पुरचुंडी करून खिडकीबाहेर टाकून दिली.

मग नायिकेकडे डोळे वटारून पाहत म्हटले, "अजून ब्रह्मपुत्रा नदीतली मगर मला कशी नाही दिसली ?"

"मगर ?" नायिका दात विचकून हसत म्हणाली.

"होय, होय. मुस्कराहट कशी नाही दिसली अजून मला सिनेमात ?"

"मी हसते आहे तर खरी सारखी सिनेमात."

"हसते आहे ?"

"मुस्कराहट म्हणजे हास्य."

""Nonsense ! उद्या तू Lackadaisical म्हणजे बर्फी असे म्हणशील. मुस्कराहट म्हणजे ब्रह्मपुत्रा नदीतील मगर." मी युक्तिवाद केला.

"छट् !" ती नायिका अडाणीपणे म्हणाली.

"बरे आहे, मी सिद्धच करून देतो." असे जोरात म्हणून मी ताबडतोब दिल्लीला ग. ज. लॉर्ड माउंटबॅटन ह्यांच्याकडे गेलो.

लॉर्ड माउंटबॅटन चीजचा डबा फोडीत होते.

मी हाक मारली, "लॉर्ड माउंटबॅटन !"

"ओ."

"खाली ठेवा तो चीजचा डबा !"

"हा ठेवलाच. चहा मागवू का ?" लॉर्ड माउंटबॅटन अदबीने म्हणाले.

"कसली पावडर वापरता ?"

"लिप्टन. हिरवे लेबल."

"बरे, चालेल. पण ह्यापुढे गुलाबी मिक्श्चर वापरत चला."

लॉर्ड माउंटबॅटननी ताबडतोब माझ्या अध्यक्षतेखाली ह्या प्रश्नाचा खल करण्याकरिता एक तज्ज्ञांची कमिटी नेमली.

ते झाल्यावर मी त्यांना म्हटले, "ह्या देशात काय भयंकर गोष्टी चालल्या आहेत त्याची तुम्हाला कल्पना आहे का ?"

"नाही बुवा ! काय ?"

"मुंबईत लोक मुस्कराहट म्हणजे हास्य असे म्हणायला लागले आहेत."

"काय म्हणता काय ?" लॉर्ड माउंटबॅटन आश्चर्याने थक्क झाले.

"अलबत !" मी ठासून म्हटले.

"मग सैन्याच्या हालचालींना सुरुवात करू म्हणता?"

"नाही. सध्या तुम्ही एक ऑर्डिनन्स काढा आणि मुस्कराहट म्हणजे ब्रह्मपुत्रा नदीतील मगर असे जाहीर करा."

"अच्छा !" लॉर्ड माउंटबॅटन म्हणाले, आणि त्यांनी ऑर्डिनन्स लिहायला सुरुवात केली--

"मी हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल व व्हाइसरॉय असा आनंदाने हुकूम काढतो की, ब्रिटिश हिंदुस्थान, हिंदी संस्थाने, अंदमान व निकोबार ही बेटे-"

मी म्हटले, "ब्रह्मदेश, सिलोन व एडन ह्यांचादेखील समावेश केल्यास बरे होईल."

"तसे करायला मला आनंद वाटला असता. पण माझा अधिकार-"

"अच्छा-अच्छा ! तुम्ही चिंता करू नका. मी सहाव्या जॉर्जना त्या बाबतीत जाऊन भेटेन."

लॉर्ड माउंटबॅटननी थोडे पुढे लिहिले, आणि ते पुन्हा थांबले. मी प्रश्नार्थक भुवया उंचावल्या.

लॉर्ड माउंटबॅटन पेन्सिल चावीत म्हणाले, "सध्या हिंदुस्थानचा अन्न-प्रश्न फार गंभीर आहे, हेदेखील आपण इथे विचारात घेतले पाहिजे."

"तेही खरेच." मी रिकामा चहाचा कप खाली ठेवीत म्हटले.

"तेव्हा मुस्कराहट म्हणजे ब्रह्मपुत्रा नदीतील मगर असे जाहीर न करता उकडलेले रताळे असे जाहीर करणे फायद्याचे ठरेल. आपली काही हरकत नाही ना असे करायला ?" लॉर्ड माउंटबॅटननी माझ्या कपात चहा ओतला.

"अन्नप्रश्न खरोखरच इतका विकट आहे का ?" मी विचारमग्नपणे म्हटले.

"हो."माउंटबॅटन हनुवटीवर पेन्सिल आपटीत म्हणाले.

"तर मला वाटते की, मुस्कराहट म्हणजे उकडलेले रताळे- असे न ठरवता उकडलेला बटाटा असे ठरवावे."

"फारच हुशार बुवा तुम्ही !" लॉर्ड माउंटबॅटन उद्गारले, आणि ऑर्डिनन्स पुरा लिहून त्यांनी माझ्या हातात दिला.

मग तो ऑर्डिनन्स मी त्या नटीपुढे आदळला.

ती नटी आश्चर्याने म्हणाली, "हे काय ?"

"ह्यात असे लिहिलंय की, तुझे तोंड उकडलेल्या बटाट्यासारखे आहे आणि त्या नायकाचे उकडलेल्या रताळ्यासारखे आहे." असे मार्मिक उत्तर देऊन मी पडद्यावरून उतरून माझ्या जाग्यावर जाऊन बसलो.

असा माझा स्वभाव करारी आहे, आणि अशा मी अनेक अचाट गोष्टी करीत असतो. लोकांच्या मात्र हे ध्यानात येत नाही. कारण मी जनरीतीप्रमाणे टाय लावून कॉलेजात लेक्चर देतो; आणि लोकांत् चारचौघांसारखा वागतो.

मी करारी आहे तसा लहरी पण आहे, आणि मनाची लहर कधी कशी फिरेल ते सांगता यायचे नाही. एकदा आमच्याकडे श्राद्धानिमित्त वामनभट आले होते. श्राद्धामुळे जेवण सपाटून झाले होते; आणि मला झोप येत होती. पण वामनभट आपले उगीचच पान तयार करीत आणि गप्पा मारीत वेळ काढीत होते.

"तर बरे का..." ते म्हणाले, आणि पानाच्या शिरा काढून त्यांनी ते आपल्या तलम धोतरावर पुसून साफ केले. त्यामुळे ते पान फार लुसलुशीत दिसायला लागले. मी चटकन् ते पान त्यांच्या हातांतून हिसकून घेतले; आणि



अनुक्रमणिका

पांढराशुभ्र वेलदोडा उशाला घेऊन त्यावर झोपी गेलो.

पण माझा खरा करारीपणा आणि चातुर्य दिसून आले असेल तर ते मी चिमणीवर फिर्याद केली तेव्हा. ही चिमणी माझ्या हॅटमध्ये घरटे बांधीत होती. माझी हॅट मी फक्त पावसाळ्यात वापरतो. इतर वेळी मी ती खुंटीला टांगून ठेवतो. मी म्हणजे माझी वायको.

एक दिवस एक चिमणी तोंडात गवताची काडी घेऊन आत आली. दारावर बसून तिने एकदा माझ्याकडे पाहिले. मग रेडिओवर बसून तिने हॅटकडे पाहिले.

तिच्या हालचाली संशयास्पद असल्याकारणाने मी तिच्यावर नजर ठेवली. तेवढ्यात सरळ ती माझ्या हॅटमध्ये शिरली आणि तेथे तिने ती काडी ठेवली. मग ती कौतुकाने हॅटकडे पाहात खिडकीच्या दारावर बसली.

मी ओरडून तिला म्हटले, ''ती हॅट माझी आहे, आणि तिच्यात गवताच्या काड्या ठेवावयाच्या नसून माणसाचे डोके ठेवायचे असते.''

मी काय बोलतो ते न ऐकल्याचा बहाणा करून ती बाहेर गेली आणि गवताची आणखी एक काडी घेऊन आली. बरोबर तिने नवऱ्यालाही आणले होते.

पुन्हा त्यांनी त्या दोन काड्या त्या हॅटमध्ये ठेवल्या. तसा मी तरातरा उठलो आणि त्या हॅटमधल्या काड्या बाहेर फेकून दिल्या, आणि दोन्ही हात उचलून 'हाऽऽ' केले.

चिमणा आणि चिमणी दोघेजण खिडकीच्या दारावर बसली. चिमणी चिमण्याला म्हणाली, ''ही माणसे किती आपलपोटी आणि रानटी असतात, नाही ?''

चिमणा म्हणाला, ''माणसे कसली ? कावळेच हे !''

चिमणी म्हणाली, ''की गिधाडे म्हणावे हो यांना !''

ह्या बोलण्याकडे अर्थात् मी दुर्लक्ष केले; आणि ती दोघेजण उडून जाईपर्यंत माझ्या हॅटचे संरक्षण करीत तेथे उभा राहिलो.

माझा स्वभाव तसा साधाभोळा असल्याकारणाने नंतर पंधरा दिवस मी माझ्या हॅटकडे पाहिले नाही. नंतर एक दिवस माझे मित्र प्रा. टकले माझ्याकडे आले. त्या टांगलेल्या हॅटच्या खाली असलेल्या खुर्चीवरच मी त्यांना बसवले. त्यांनी हॅट काढली; आणि त्यांचे टक्कल प्रसन्नतेने चकाकले.

आमच्या गप्पा सुरू झाल्या आणि त्या ऐन रंगात आलेल्या असताना प्रा. टकल्यांच्या डोक्यावर एक काडी पडली. त्यांनी ती काडी घेऊन चावायला सुरुवात केली. माझ्या मनात मात्र एक दुष्ट शंका डोकावली.

तेवढ्यात दुसरी एक काडी टकल्यांच्या डोक्यावर पडली. त्यांनी ती काडी दुसऱ्या हातात घेतली आणि मग काही वेळ त्यांनी गोंधळलेल्या नजरेने तिच्याकडे पाहिले. ते मला म्हणाले, ''ह्या काडीचे काय करावे हो ?''

मी म्हटले, ''मला वाटते, तिने कान कोरावा.''

''छट् !'' प्रा. टकल्यांनी नापसंती दर्शविली.

''तर मग ती तशीच डोक्यावर राहू द्यावी.'' मी दुसरी शक्कल सुचविली. प्रा. टकल्यांना ते पटले. त्यांनी ती काडी माझ्या डोक्यावर ठेवली आणि ते पुढे बोलू लागले.

तेवढ्यात तिसरी काडी प्रा. टकल्यांच्या डोक्यात पडली. तेव्हा त्यांनी डोके हलवले. त्यामुळे त्यांना एकदम् आपल्याला घरी जायचे आहे याची आठवण झाली. ते ताडकन् उठले. त्यावरोबर हॅटला धक्का बसला, आणि एक पांढरे शुभ्र अंडे प्रा. टकल्यांच्या डोक्यावर पडले. तेथे क्षणभर स्थिरावले. मला भीती वाटली की, प्रा. टकले ते उचलून तोंडात टाकतील. पण तेवढ्यात त्यांनी हॅट डोक्यावर घातली आणि लगबगीने ते चालायला लागले.

मी त्यांच्या मागोमाग पुढे होत ओरडलो, ''अहो, अंडे अंडे !''

प्रा. टकले मागे वळून हसत म्हणाले, ''अच्छा, अच्छा ! शेक हँड !''

निराशेने मी मागे परतलो. तेवढ्यात चिमणी लगवगीने हॅटच्या बाहेर पडली. मी तिला हटकले आणि ओरडलो, ''आताच्या आता माझ्या हॅटमधून आपले बिऱ्हाड हालव.''

चिमणी चीत्कारली, ''भाडे-नियंत्रण कायद्यान्वये मला जागा खाली करायला सांगायचा तुम्हांला मुळीच अधिकार नाही. मी मात्र प्रा. टकल्यांच्या विरुद्ध माझे अंडे चोरल्यावद्दल फौजदारी खटला करणार आहे. आणि त्यांचे साथीदार म्हणून तुमचेही नाव त्यात गोवणार आहे.''

आणि उद्धटपणे पंख फडफडवीत ती निघून गेली.

त्यानंतर काय झाले ती हकीकत वर्तमानपत्रांतून जनतेला वेळोवेळी कळलेलीच आहे. प्रा. टकल्यांना



अनुक्रमणिका

ताबडतोब गिरफदार करण्यात आले आणि त्यांच्यावरचा आरोप शाबीतही झाला. प्रा. टकले आपले चोरून चुंबन घेतात असे त्यांच्या पत्नीने भर कोर्टात सांगितल्यामुळे त्यांना चोरी करायची सवय आहे ही गोष्ट पूर्णपणे सिद्ध झाली, आणि त्यांचा बचाव करण्याचा मार्गच खुंटला.

मी मात्र केवळ माझ्या चलाखीने सुटलो.

मला विचारण्यात आले, "प्रा. टकल्यांच्या डोक्यावरचे अंडे तुम्ही पाहिलेत की नाही ?"

मी म्हटले, "हो."

"मग त्यांना चोरी करताना पाहून तुम्ही आरडाओरडा कसा केला नाही ?"

मी म्हटले, "प्रा. टकल्यांना डोक्यावर अंडे ठेवून फिरण्याची सवय आहे. त्यामुळे मला वाटले की ते अंडे त्यांचेच असावे."

"प्रा. टकले अंडी घालतात, असे तुम्हाला सुचवावयाचे आहे की काय ?"

"होय, मला तसेच निक्षून सांगायचे आहे. शिवाय प्रा. टकल्यांना कॉलेजात उडत जाताना मी पाहिलेले आहे." मी धीटपणे म्हणालो.

"मलाही ते कधी कधी 'उडत जा' असे म्हणतात !" असे उद्गार काढून सौ. टकल्यांनी माझ्या बोलण्याला पुष्टी दिली.

त्यामुळे मी निर्दोषी ठरलो, आणि प्रा. टकले ह्यांच्याकडे बघण्याचा कोर्टाचा दृष्टिकोणही अजिबात बदलला. त्यांना तुरुंगात टाकण्याऐवजी न्यायाधीशमहाराजांनी हिंदुस्थान सरकारला अशी शिफारस केली की, इक्वेडॉर देशातील मुलांना भेट म्हणून हत्ती पाठविण्याऐवजी प्रा. टकल्यांची तेथे रवानगी व्हावी.

त्यानुसार प्रा. टकले इक्वेडॉरला गेल्याचे वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेले आहेच. डोक्यावर अंडे ठेवून काढलेला प्रा. टकल्यांचा फोटो 'इलस्ट्रेटेड वीकली' मध्ये आल्याचे सर्वांना स्मरत असेल. मुंबई विद्यापीठाच्या प्राध्यापकांनी त्यांना पुष्पहार घालून त्यांचा सन्मान केला. त्या वेळी झालेल्या भाषणात त्यांच्या अंडी घालण्याच्या कर्तृत्वाचा विशेष गौरव करण्यात आला. त्याचप्रमाणे ही कर्तबगारी इतके दिवस उघड न करण्यात त्यांचा विनय दिसून येतो असेही म्हणण्यात आले. तेव्हा ते सरळ मनाचे गृहस्थ म्हणाले, "माझ्याप्रमाणेच तुम्हा सगळ्यांना देशोदेशी पाठविण्यात येईल, अशी आशा मी व्यक्त करतो."

त्या खटल्यातून माझी सुटका झाल्यानंतर मी चिमणीवर कायदेशीर इलाज करण्याकरिता ताबडतोब वकिलांकडे गेलो. त्यांना एक कडक नोटीस लिहायला सांगितली. मी ती वाचली आणि म्हटले, "वकीलसाहेब! मी तुम्हाला कडक नोटीस लिहायला सांगितलं होतं ना?"

"होय, तशीच लिहिली आहे."

"मग त्यात whereas हा कडक शब्द एकदाही नाही हे कसे काय ? हेच का तुमचे कायद्याचे ज्ञान ?"

"चुकलो. माफ करा." वकीलसाहेब म्हणाले.

"मग whereas हा शब्द सात वेळा घालून ती पुन्हा लिहून काढा."

त्यांनी तसे केल्यावर मी म्हटले, "आता पुढे असं लिहा : 'In testimony whereof is set the seal of the said university and the said chancellor !' "

वकीलसाहेब म्हणाले, "अहो, पण हे डिग्रीच्या सर्टिफिकेटवर लिहायचे असते."

"त्याच्याशी मला काहीही कर्तव्य नाही. ते कडक आहे की नाही ते बोला." मी मूठ आपटून म्हटले.

"वा ! कडक म्हणजे काय ? भलतेच कडक !" वकीलसाहेबांनी कबुली दिली.

"तर मग ते अलबत् नोटिशीत घाला."

तयार झालेली नोटीस मी चिमणीला दिली. चिमणीने ती आपल्या घरट्यात ठेवून तिच्यावर काड्या टाकल्या. मी त्या अपमानास्पद वागणुकीकडे दुर्लक्ष केले; आणि नोटिशीची पावती मागितली. तेव्हा तिने शाईच्या पॅडवर पाय ठेवून मग त्याचा ठसा एका कागदावर उमटवला आणि ती पावती मला दिली.

त्यानंतर चिमणीने नोटिशीला उत्तर तयार करून आणले. त्यात whereas हा शब्द अकरा वेळा वापरलेला होता. शिवाय शेवटी एक उपनिषदातले अवतरण होते. त्याचा अर्थ असा : "माणसाला दोन पाय असतात, दोन कान असतात आणि डोळेही दोनच असतात."

ह्या कडक उत्तरामुळे मी मुळीच डरलो नाही.

whereas ह्या शब्दाने अथपासून इतिपर्यंत भरलेली नोटीस मी तिला दिली. नोटिशीच्या शेवटी, 'नेबुकडनेझर' व 'खतरनाक' हे अत्यंत कडक शब्द मी वापरले होते.

असे आमचे भांडण खूपच रंगले. एक दिवस मी माझ्या मुलाला कावळा-चिमणीची गोष्ट सांगत होतो : ''कावळ्याचे घर होते शेणाचे आणि चिमणीचे घर होते मेणाचे.''

तेवढ्यात चिमणी तिथे येऊन म्हणाली, ''नाही रे मुला. चिमणीचे घर मुळीच मेणाचे नसते. ते असते गवताच्या काड्यांचे आणि कापसाचे.''

आणि तिने स्वतःचे घर त्याला दाखवून त्याच्या मनातला माझ्याविषयीचा आदर नाहीसा करून टाकला.

ह्या गोष्टीचा सूड म्हणून '...तिचे (चिमणीचे) वाटीएवढाले डोळे' अशी ओळ असलेला अभंग पुन्हा मी रेडिओवर ऐकू लागलो.

चिमणी ह्या गोष्टीचा निषेध करायची, चिवचिवाट करायची. पण मी पुन्हा पुन्हा तो अभंग लावायचो. रेडिओवर लागत नसला तर ग्रामोफोनवर लावायचो. मला वाटे की, तुकारामबोवांच्या पागोट्यातही चिमणीने घरटे बांधले असावे; आणि त्याच वेळी त्यांना हा अभंग सुचला असावा.

असो. अखेर माझ्या रेडिओवर ठेवलेल्या लाकडी हत्तीने आम्हा दोघांत समझोता घडवून आणला. त्याद्वारे असे ठरले की, चिमणीची पिले मोठी होईपर्यंत तिला माझ्या हॅटमध्ये वास्तव्य करून राहण्याचा अधिकार असावा. त्यानंतर मात्र तिने शेजारच्या अरविंदाच्या हॅटमध्ये घरटे बांधावे. दोन्हा पक्षांनी आपापले कडक शब्द मागे घ्यावे.

ह्या झगड्यात आलेल्या यशामुळे माझा आत्मविश्वास बराच वाढला. एक दिवस सगळ्या गणिताच्या पुस्तकातील दशांश अपूर्णांक मी पळवून आणले; आणि मुलाने विचारलेल्या गणितातल्या शंकांचे समाधान न करता येणाऱ्या नामुष्कीच्या प्रसंगातून सर्व आई-बापांना वाचवले. एका सुप्रसिद्ध भावगीत-गायकाचे गाणे बाटलीत भरून ते एरंडेल म्हणून विकण्याचा उपक्रम मी साधारणतः त्या वेळीच सुरू केला. नंतर पौर्णिमेच्या दिवशी मी चंद्राला गोळी घालून खाली पाडले आणि एका सिनेमा कंपनीला भाड्याने दिले. अलीकडे चांदणे पडत नाही ते त्यामुळेच. खगोलशास्त्रज्ञ ह्या बाबतीत खूपच चर्चा करीत आहेत हे मला माहीत आहे. पण माझा त्या गोष्टीला इलाज नव्हता. सिनेमातले खोटे चंद्र पाहून मी अगदी वैतागून गेलो होतो. मात्र खगोलशास्त्रज्ञांना तात्पुरता जर चंद्र हवा असला तर तो देण्याची व्यवस्था करता येईल. उत्तराकरिता तिकिटे पाठवून पत्रव्यवहार करावा. व्यवहार जमल्यास चंद्र व्ही.

---





अनुक्रमणिका

पी. ने पाठविण्यात येईल. मधुचंद्राकरितादेखील चंद्र देण्यात येईल. मात्र मधु ज्याचा त्याने स्वतः आणावा.

ह्या सगळ्या गोष्टी मी करीत असताना आंतरराष्ट्रीय राजकारणाकडे मात्र माझे लक्ष वेधले नव्हते. पण परवा मी दाढीची पाती आणायला गेलो असताना अचानक त्या प्रश्नात मी गुरफटला गेलो.

दुकानदाराकडून मी एक पाते घेतले आणि त्याला एक आणा देऊ केला. तेव्हा दुकानदार म्हणतो, "नाही साहेब! दीड आणा द्यावा लागेल तुम्हाला."

"मग तुम्हाला पण मला आणखी अर्धे पाते द्यावे लागेल." मी चाणाक्षपणे म्हटले.

"तसे नव्हे. पात्यांच्या किंमती वाढल्या आहेत." दुकानदाराने स्पष्टीकरण केले.

"का म्हणून ?" मी आवाज चढवला.

"कोरियातील युद्धामुळे."

"म्हणजे कोरियात अमेरिकन व चिनी सैनिक समोरासमोर बसून परस्परांच्या दाढ्या तासत असतात असे तुम्हाला म्हणायचे आहे की काय ?" मी त्याचेच म्हणणे त्यालाच स्पष्ट करून सांगितले.

"नाही साहेब. ते बंदुकांनी लढाया करीत असतात."

"होय ना ? मग मूर्ख माणसा, ते सैनिक परस्परांच्या दाढ्या करतात असे तू का म्हटलेस ? जनतेच्या मनात विनाकारण गोंधळ व भीती निर्माण केल्याबद्दल तुला तावडतोब अटक केली पाहिजे." मी त्या माणसाला चांगलाच चमकावला.

नंतर मी तडक स्टॅलिनला भेटायला गेलो. स्टॅलिन आपले ॲटम बॉंब मोजीत बसला होता, आणि मांजराने एक ॲटम बॉंब खाल्यामुळे त्याच्याशी भांडत होता.

मी ताडकन् पुढे झालो आणि स्टॅलिनच्या तोंडातला पाईप ओढून घेतला. स्टॅलिन चपापला.

मी म्हटले, ""स्टॅलिन ! काय चावटपणा मांडला आहेस तू आजकाल ? ॲटम बॉंब कसले बनवतोस ?"

स्टॅलिन म्हणाला, "मला ॲटम बॉंब आवडतात. त्यांचा खूप मोठा आवाज होतो."

"पण त्यामुळे दाढीची पाती महाग होतात त्याचं काय?" मी भेदक प्रश्न टाकला.

स्टॅलिन आश्चर्याने म्हणाला, "महाग कशी होतात बुवा ? माझ्या पंचवार्षिक योजनेप्रमाणे तर-"

मी त्वेषाने म्हटले, "वेड्या माणसा ! पाच वर्षांनंतर मी दाढी करावी असं तुझं म्हणणं आहे की काय ?"

"नाही. नाही." स्टॅलिन चाचरत म्हणाला.

"नाही कसं ? होय. आणि ते मला बिलकूल मान्य नाही." मी असे म्हटल्यानंतर स्टॅलिनचे बोलणे खुंटले. तो एक ॲटम बॉंब झेलत गप्प उभा राहिला.

तेव्हा मी पुन्हा म्हटले, "आण ते सगळे ॲटम बॉंब इकडे. मी ते जप्त करणार आहे. आणि हे पहा, ॲटम बॉंबचे उत्पादन बंद."

मग मी स्टॅलिनजवळचे एकोणपन्नास ॲटम बॉंब आणि ॲटम बॉंब खाणारे ते मांजर घेऊन जो निघाले ते थेट व्हाईट हाऊसमध्ये जाऊन थडकलो. प्रेसिडेंटसाहेबांचा चष्मा काढून घेत मी म्हटले,

"का हो हरिभाऊ सोमण ?"

"नाही- हॅरी ट्रुमन."

"नव्हे, हरिभाऊ सोमणच. असे नसते तर तुम्ही मराठीत हो कसे बोलला असता ?" मी तल्लखपणाने उत्तर दिले.

त्यामुळे प्रेसिडेंटसाहेब निरुत्तर झाले; आणि मग त्यांच्याजवळचे दोनशे ॲटम बॉंब हस्तगत करायला मला मुळीच वेळ लागला नाही.

ॲटम बॉंबचं गुपित हे असे आहे. सगळे ॲटम बॉंब आज माझ्याजवळ आहेत. त्यामुळेच तर जागतिक युद्धाला सुरुवात होऊ शकत नाही; आणि कोरियात शस्त्रसंधीच्या वाटाघाटी चालल्या आहेत त्या ह्यामुळेच.

ह्या दिवाळीत आमच्या वाडीत मात्र खूप गंमत येणार आहे. कारण ॲटम बॉंबचा कोट मी त्या वेळी उडविणार आहे. मात्र प्रश्न इतकाच आहे की, त्या मांजराच्या पोटातला ॲटम बॉंब कसा उडवायचा !

❖❖❖

**गंगाधर गाडगीळ**

'गाडगीळांच्या कथा',
संपादक - श्री. पु. भागवत,
कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे
१९८१, कथा पृष्ठे ९७ ते १०८

(कॉन्टिनेन्टल प्रकाशन,
पुणे यांचे सौजन्याने )



अनुक्रमणिका

# कैरी

जी. ए. कुळकर्णी

मोटरस्टँडवरून दवाखान्याकडे येताना मळकी चड्डी घातलेले, बटणे नसलेल्या सदऱ्याचे एक पोर पुढे आले. पण श्रीपूमामाने त्याला नको म्हणत बॅग हातात घेतली, व आम्ही चालू लागलो. रस्ता पांढट धुळीचा होता, आणि असली माती मी पूर्वी कधी पाहिली नव्हती. आमच्या गावात एकदा बाहेरून फिरून खेळून आले की सदरा आणि पाय लालभडक होऊन जात. पण येथे बघावे तर सगळीकडेच जळाल्याप्रमाणे राख दिसत होती, आणि मधूनच मी पावलांनी मुद्दाम धूळ उडवत होतो. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना मधून मधून बोटभर काट्यांचे, लाल फळांचे फड होते, व त्यांतून सूं सूं आवाज करत, शेपट्यासारख्या वळवळत भस्सदिशी डुकरे बाहेर येत. हे देखील मला फार नवीन होते. पण श्रीपूमामा मात्र कशाकडे न पाहता, काही न बोलता चालला होता. वाटेतच त्याची एक वहाण तुटली, तेव्हा तो एक पाय ओढू लागला, आणि तो अगदी दमून गेला.

दवाखान्याच्या मोठ्या इमारतीमागे खूप अंतरावर तानीमावशीचे घर होते. श्रीपूमामाने बॅग आत ठेवली, व तो निमूटपणे अंग आवळून बसला. तानीमावशी धावतच बाहेर आली, व मला मिठी मारून एकदम रडू लागली. मला त्या वेळी काय करावे हे समजेना. मला तर फार भूक लागली होती, व मळके हातपाय थंडगार पाण्याने धुवायचे होते. पण तानीमावशी तर सारखे हुंदकेच देत होती.

"याच वेळी नशिबानं कसा दावा साधला बघ श्रीपू," ती मला तसेच जवळ धरत म्हणाली, "आभाळ फाटल्याप्रमाणे पाऊस बघ. तुझं पत्र आलं तेव्हा तोंडात पाण्याचा थेंब न घालता ओढ्याकाठी जाऊन बसले, खोटं सांगत नाही तुला ! पण दोन दिवस इकडच्या मोटारी इकडे, तिकडच्या तिकडे ! दोन दिवस पाण्याला उतार नाही. सोलापूरकडून जायचं म्हणजे तीनचार दिवस लागले असते, आणि तिकडे देखील पाऊस नसेल तर ! दोन दिवस मी तश्शी बसून होते, आणि व्हायचं ते होऊन गेलं. कमळीची काही भेट झाली नाही अखेरपर्यंत !"

त्या वेळी श्रीपूमामा आईशेजारी बसून तानीमावशीची वाट पाहत होता. आई शुद्धीवर होती, तोपर्यंत तानी आली नाही काय म्हणत या कुशीवरून त्या कुशीवर होत होती. शेवटच्या दिवशी तिची शुद्धी गेली, व तिचे डोळे काचेच्या गोट्यासारखे झाले. नंतर ती कोणालाच ओळखेना, व ती काय बोलत आहे हे कोणालाच समजेना. श्रीपूमामाने रात्री तिला चमच्याने दूध घातले, ते तिच्या ओठांवरून दोन्ही बाजूंनी बाहेर पडले. पहाटेला ती वारली. नंतर श्रीपूमामाने मला बरोबर येऊ दिले नाही. मी घरात एकटाच होतो. आई नाही हे प्रथम मला जाणवलेच नाही. पण तिच्या रिकाम्या जागेकडे नजर जाताच मात्र भाजल्याप्रमाणे मला समजले- आई नाही, एवढेच नाही तर ती आता कधीच परत येणार नाही. मग मात्र माझे अंगच गळाले. श्रीपूमामा परतला त्या वेळी मी झोपलो होतो, पण माझे गाल पाण्याने ओले झाले होते.

"तिच्या घरात लग्न झाले, त्या वेळी मीच अंथरूण धरलेलं. नाना वारले त्या वेळी हे आजारी, आणि आता तीच गेली तेव्हा ओढा आडवा आला. लग्ने झाल्यावर आम्ही दोघी निरनिराळ्या दिशेने गेलो बघ. दोन डोळे शेजारी, भेट नाही घरादारी ! शेवटी तिला फार यातना झाल्या काय रे श्रीपू ?"

श्रीपूमामा जागच्या जागी उगाचच हलला. तो म्हणाला, "तुला मी आता खोटं कशाला सांगू तानी ? सातआठ दिवसांतच ती एका हाताने उचलण्यासारखी झाली. नाना गेल्यावरच खरं म्हणजे ती संपली. पोर होतं म्हणून शिजवायची, दोन घास गिळायची इतकंच. अग, कोणाची तरी गाय व्याली म्हणताच ओळखदेख नसता तिकडे सूपभर तांदूळ पाठवणारी ती बाई, लोकांच्या घरी स्वयंपाक खाऊन आनंदाने जगणार होय ?"

"थोडे दिवस तिला इथं आणून ठेवावं असं मला फार वाटायचं. सारखा जीव तुटायचा बघ माझा," तोंड पुसत तानीमावशी म्हणाली, "पण नंतर माझं मीच म्हणायची, इथली घाण तरी तिला समजायला नको."

मला वाटू लागले, ही आता उठते की नाही ? तानीमावशी आईइतकी गोरीपान नव्हती. ती सोललेल्या बदामासारखी होती, आणि तिच्या हनुवटीवर गोंदलेले हिरवे टिंब होते. तिच्या कानांतील कुड्यांचे बारीक मोती



अनुक्रमणिका

अगदी झिजून सैल झाले होते. गळ्यात मळक्या दोऱ्याच्या मंगळसूत्राबरोबर एक फिकट पिवळ्या मण्यांची बोरमाळ सोडली तर तिच्या अंगावर दागिना नव्हता. अखेर तानीमावशी थांबली, व मला आत घेऊन गेली.

तानीमावशी फक्त एकदाच आमच्या घरी आली होती. भाऊरावांची पहिली• नोकरी गेली, दुसरीही मिळाली, तेव्हा इकडे येताना ती आमच्यात एक दिवस राहिली होती. त्या वेळी तिने लाल टोपपदराचे लुगडे नेसले होते. तिने मला उगाचच कडेवर घेतले. तिला त्या वेळी देखील जुन्या देवघराचा वास होता. आईने मग भाऊरावांसाठी मुद्दाम केनाच्या पानांची भजी केली होती. पण त्यांतील आम्हांला मात्र काहीच मिळाले नाही. खरे म्हणजे मी आणि सुम्मीने जैन बस्तीच्या मागे जाऊन धुंडाळून ती पाने आणली होती, पण मलाच मात्र एवढेसे बुडकुलीएवढे एकच भजे मिळाले, आणि त्यात देखील पान नव्हते. मी म्हणालो, "आई, हे असलं कसलं भजं?" तर आईने उलट मलाच चिमटा काढला, व म्हटले, "ओरडून खापऱ्या उडवू नको कारट्या ! पाने सगळी संपली. आणि पानाशिवाय भजं खाल्लंस तर डोक्यावर काही शिंग उगवायचं नाही. आधीच एक शिंग आहे तुला !" सुम्मीने ते ऐकले, व ती तोंड झाकून सारे जेवण होईपर्यंत हसत होती. संध्याकाळी तानीमावशी गेली. जाताना मलाच तेवढा तिने एक आणा हळूच दिला, आणि म्हटले, "ये कधीतरी आमच्या घरी !" मी तो आणा सुम्मीला दाखवला. तिला काहीच मिळाले नव्हते. मी म्हटले- सुम्मी बसली चरफडत !

तानीमावशीचे घर फार जुने होते, आणि लहान होते. घरात भिंतीवर एकही फोटो नव्हता, स्वैंपाकघरात एका लाकडी कपाटाआड झोपायची जागा होती, आणि त्याच ठिकाणी माळ्यावर जुने सामान होते. जुन्या बुट्ट्या, शिंकी, एक मोठा डेरा, मोडका पाळणा, बादली. माजघर देवघर काही नाही. बाहेरच्या बाजूला फक्त एक खोली. मी हात उंच केला तर हाताला लागेल एवढे एक सीताफळाचे झाड आंगणात होते, व त्यावर दोन लहानसर पण काळी पडलेली फळे होती. तानीमावशीने मला आत नेले व एका वाटीतून लाडू दिला. तो फार घट्ट होता, व तो मला फुटता फुटेना. मी म्हटले, "तानीमावशी, असला कसला ग हा दगडासारखा लाडू? मला नको." त्यावर काही न बोलता खाली मान घालून तिने तो बाजूला सरकवला, व मूठभर शेंगदाणे माझ्यासमोर ठेवले. "आता एवढं खाऊन घे. मग तासाच्या आत स्वैंपाक होईल."

तिने चूल पेटवताच आत सारे धुराने भरून गेले, व मी बाहेर आलो. श्रीपूमामा अद्याप तसाच बसला होता. मी त्याच्याजवळ बसत म्हटले, "अरे, ही कसली काळी सीताफळं ?"

तो एकदम डिवचल्याप्रमाणे जागा झाला, व म्हणाला, "आँ ? काय म्हणालास ?" पण तो सीताफळाविषयी काहीच बोलला नाही. त्याने मला जवळ घेतले, व म्हटले, "आता इथंच शाळेत जायचं, दररोज अभ्यास करायचा, वाटेल त्या पोरांत भटकायचं नाही, समजलं ? आणि तानीपुढे कसलाही हट्ट करायचा नाही."

मग मला सजमले, श्रीपूमामा चार दिवसदेखील येथे राहणार नाही. तानीमावशीने फार आग्रह केला, पण तो त्याच दिवशी निघाला. जेवणे झाली. मला भातात दूध लागे, पण आज तानीमावशीजवळ दूध नव्हते. मी भात तसाच सोडला. आता मला झोप यायला लागली होती व मी बाहेरच्या खोलीत पसरलो. श्रीपूमामाने हाक मारत म्हटले, "मी येतो रे, दिवाळीच्या सुट्टीत येऊन भेटतो पुन्हा- आणि सांगितलेलं सगळं चांगलं ध्यानात ठेव." त्याने वहाणांच्या पट्टीला सुतळी बांधली होती. पण पायरी उतरताना तो ठेचाळला, व ती तटकन् तुटली. त्याने वहाणा काढल्या व बाजूला सीताफळीजवळ टाकल्या, आणि तो अनवाणीच निघाला.

"एक दिवस राहिला असतास, तर लखू चांभारानं शिवून दिल्या असत्या," तानीमावशी म्हणाली.

"नाही ग, त्याच्यात आता काही उरलंच नाही. उलट आता मला मोकळं वाटतं बघ, पाय काही फाटत तुटत नाहीत," तो म्हणाला, पण त्यावर तो का हसला नाही कुणास ठाऊक ! मी परत येऊन जाजमावर पडलो. तानीमावशी मात्र आंगणात बराच वेळ तिकडे पाहत उभी होती. नंतर ती माझ्याजवळ आली, व तिने मला उठवले. "आत झोप चल. येथे नको. ही त्यांची खोली आहे, आणि त्यांना तू इथं आलेलं आवडणार नाही."

तिने आतच माझ्याकरिता एक कोपरा झाडून त्या

ठिकाणी एक चटई टाकली, व तिच्यावर जुनेऱ्याची घडी पसरली. कपाटात ती लोणच्याची वरणी, बाटल्या, चहापुडीचा डवा ठेवत असे. पण तिने माझ्याकरिता खालचा खाना रिकामा केला, व म्हटले, "यात तू तुझं सामान ठेवत जा."

मग मी बॅग उघडली. श्रीपूमामाने माझी पुस्तके, एक वही, कपडे व्यवस्थित ठेवले होते. पेन्सिली, शिसपेन यांची डबीदेखील ठेवून त्याने आठवणीने त्यात एक जुने ब्लेड ठेवले होते. पण सर्वांत खाली काहीतरी रंगीत दिसताच मला फार नवल वाटले. तो एक नवा करकरीत रंगीत भोवरा होता, व सोबत त्याची जाळीदेखील होती. मी मागे एकदा त्याला म्हटले होते, 'मला सीतारामसारखा एक भोवरा पाहिजे.' पण नंतर ते माझ्या ध्यानात देखील राहिले नाही. आणि आता श्रीपूमामाने तो हळूच माझ्या बॅगमध्ये ठेवला होता. मी म्हटले, आता श्रीपूमामाला पुन्हा भेटल्यावर सांगितले पाहिजे- माझी चांगलीच गंमत केलीस की !

मी सारे सामान्य खान्यात भरले व मऊ जुनेऱ्यावर पडलो. त्याचा स्पर्श होताच तानीमावशीने कुरवाळल्याप्रमाणे अंग सैलसर आळशी झाले. थोड्या वेळाने दवाखाना बंद झाला, व त्याच्या समोरील आंगणात मोठी चौकोनी दिवा लागला. भाऊराव मग घरी आले. त्यांनी बाहेर कोट काढून ठेवताना माझ्याकडे पाहिले, पण ते माझ्याशी एक शब्द बोलले नाहीत. केव्हा आलास हे तरी त्यांनी मला विचारायला हवे होते. पण ते तानीमावशीला म्हणाले, "म्हणजे अखेर ही ब्याद येऊन पडली म्हणायची !"

"निदान हे अन्न उकिरड्यावर न पडता आपल्याच रक्ताच्या माणसाकडे जातं," तानीमावशी म्हणाली. भाऊरावांनी तिच्याकडे रागाने पाहिले, पण नंतर काही न बोलता ते जेवू लागले.

दुसऱ्या दिवशी रविवार होता. आवारातच दूर चिंचेचे एक मोठे झाड होते त्याखाली तानीमावशीने खरकटी भांडी नेऊन ठेवली. तेथील तारेच्या कुंपणामागे ओढा होता, पण आता उन्हाळा असल्यामुळे ओढ्यांत सारी वाळूच भरली होती. पलीकडे मात्र पानमळे, शेते दिसत होती, व मधून मधून मोटेचा कर्र कर्र आवाज येत होता.

"आणखी थोडे दिवस जाऊ दे बघ, पाऊस सुरू झाला की ओढ्याला असं पाणी येतं, की ते थेट चिंचेपर्यंत येतं," तानीमावशी अभिमानाने म्हणाली. मी अद्याप एकही ओढा नदी जवळून पाहिली नव्हती. आंगणातच एवढ्या जवळ पाणी म्हणताच ते मला फार आवडले, आणि पावसाळा एकदा केव्हा सुरू होतो, असे मला वाटू लागले.

नऊ साडेनऊ वाजता भांडी घासण्यासाठी तुळसा आली. तिला बघितल्यावरच मला राग आला. ही असली कसली मोलकरीण ? तेथल्या पद्धतीप्रमाणे तिने जमिनीवर लोळणारे लुगडे नेसले होते, व ती चालली की फट्क फट्क धूळ उडत असे. तिने नाकात नथ अडकवली होती, तिच्या डोक्यावरचा पदर सारखा पडत होता, आणि ती पान चघळत होती. पान चघळणाऱ्या बायका नेहमी हलकट असतात असे नाना नेहमी म्हणत. मोलकरणीने मोलकरणीसारखे दिसावे. ही बया तर नाटकातल्या बाईसारखी दिसत होती. ती जवळ आली, व पान एका गालात गोळा करून म्हणाली, "काय रे, तुझं नाव काय ?"

मी लगेच म्हणणार होतो, 'माझं नाव तुझं बोडकं !' तोच तानीमावशी दारातून ताडकन् म्हणाली, "सांभाळून बोलावं, तुळसा, माणसानं ! त्याला अरेतुरे बोलायचं नाही. तो माझ्या बहिणीचा मुलगा आहे. इथे शाळेकरिता आलाय."

तुळसाने तिच्याकडे उद्धटपणे पाहिले व ती हसली. "व्हय बाय, सगळ्यांनीच पायरी बघून पाय उचलावं."

तानीमावशीचा चेहरा उतरला, ती एकदम आत गेली. भाऊराव गाणे गुणगुणत बाहेर आले. त्यांनी देखील सकाळीच पान खाल्ले होते. त्यांनी दहाबारा चांगली रसरशीत पाने व मूठभर सुपारी पुढे केली व तुळसाला म्हटले, "ही पाने वाळत जाऊन अगदी खराब होत आहेत. बघ तुला चालतात का !"

तुळसाने पाने घेतली, व कमरेला खोचलेल्या लाल चंचीत खुपसली. पाने मुळीच वाळली नसून स्वच्छ, चांगली, राघूच्या पंखासारखी होतनी.

त्या दिवशी संध्याकाळी मला फार कंटाळा आला. मी म्हटले, "तानीमावशी, इथं किल्ला, मशीद असलं काही बघण्याजोगं नाही होय ?"

तिला एकदम शरमल्यासारखे वाटले, "नाही रे, हे

गाव अगदी साधं आहे. हां, तू राजेसाहेबांची विहीर बघून येतोस का ? जाऊन ये, फार दूर नाही. मी त्या पाराप्पाच्या रतनला हाक मारते. तो तुला घेऊन जाईल.''

तेथूनच तिने हाक मारली. दवाखान्याच्या आवाराबाहेर धनगरांच्या झोपड्या होत्या. त्यातून माझ्याएवढाच एक पोरगा बाहेर आला व ओरडला, ''काय व्ह बाय ?''

''अरे याला राजेसाहेबांची विहीर दाखव. बसून पोरगा कंटाळला बघ. आणि तिथं मोर दिसले तर ते देखील दाखव त्याला. नंतर तुला मी शेंगदाणे देते. जा.''

मी रतनबरोबर गेलो, ओढा ओलांडून एक शेत मागे टाकल्यावर ती विहीर होती. भोवती पिसासारख्या पानांची खूप झाडे होती, व त्यांच्या खाली पडलेल्या फुलांवरून जाताना मऊ गालिच्यावरून चालल्यासारखे वाटत होते. विहीर फारच प्रचंड होती, व आत सगळीकडे हिरव्या दाढीप्रमाणे भिंतीतून झाडी उगवली होती. पण विहीर एकदा पाहिल्यानंतर मग पाहण्याजोगे तिच्यात काहीच नव्हते.

''आत पारवाळं हायीत,'' रतन म्हणाला. त्याने एक दगड दबकदिशी पाण्यात टाकताच एकदम फडफड आवाज होऊन शंभर पारवाळे एकदम वर उडाली, गोल गोल फिरली व पुन्हा आत उतरून घुम घुम करू लागली.

''वरल्या बाजूला गणेशाचं एक देऊळ व्हत्तं,'' एका बाजूला हात दाखवत रतन म्हणाला, ''व्हय, एकदा ते पडलं, ते सगळं आतच गेलं. पानी जास्त उतरलं की गणेशाची सोंड दिसतीया वरून !''

मी भोवती न्याहाळून पाहिले, पण मला मोर काही दिसले नाहीत. मी त्याबद्दल रतनला विचारले तर तो हसायला लागला. तो म्हणाला, ''मोरं काय असं वाटेल त्या वेळी दिसत्यात ?'' त्याने मध्येच चुटकी वाजवली, ''अशी येत्यात, अशी जात्यात. हिरवी निळी वीज असत्येय राव ती वीज !'' पण तो बोलताना एकदम थांबला, व त्याने समोर झुडपात बोट दाखवून डोळ्याने मला खूण केली. मग तो म्हणाला, ''बघितल्यात ? मोर. एकच व्हतं !''

''कुठाय ? कुठाय ?'' मी विचारले.

''कुठाय कुठाय काय ?'' तो हसत म्हणाला, ''ते गेलं सुद्धा !'' मला तर हलणाऱ्या झुडपाखेरीज काहीच दिसले नाही.

पंधरा मिनिटांतच मी परत आलो, व म्हटले, ''तानीमावशी, त्या विहिरीत काय ग बघायचं ?'' ती म्हणाली, ''आता मी तरी काय करू, सांग बाबा ! गावच असं रायवळ पडलं !''

तानीमावशी सतत दोन दिवस सकाळी बाहेर गेली होती, तेव्हा मी आजूबाजूला फिरून पाहिले. दवाखाना बराच मोठा होता, व त्याच्या एका बाजूला लाकडाची जाळी मारलेल्या घरात डॉक्टर राहत होते. मी त्यांना अद्याप पाहिले नव्हते. आवाराच्या बाहेर पायऱ्या पायऱ्यांची गोडी विहीर होती. संध्याकाळ झाली की तुळसाप्रमाणे लुगडी नेसलेल्या बायका पायऱ्या उतरून खाली जात, व एक एक विहिरीतून उगवल्याप्रमाणे मातीच्या घागरी डोक्यावर ठेवून वर येत. मग वडाच्या पारंब्यांआड खिडकीमागे असल्याप्रमाणे लाल सूर्य दिसे, आणि अंधार पडताच जणू कोणी त्यांना मुद्दाम बोलावणे पाठवल्याप्रमाणे न चुकता ओढ्याच्या काठावरून घुवडे ओरडू लागत.

तानीमावशी आली व म्हणाली, ''अरे, उद्यापासून शाळेत जायचं. मी तुझं नाव घालून मास्तरांना सांगून आले आहे.''

मग मी पाटी काढून कोळशाने घासून ठेवली, व एका काड्याच्या पेटीत पेन्सिली घातल्या. तानीमावशीने हातानेच माझे केस मागे परतवले, व ती माझ्याबरोबर शाळेत आली. शाळेभोवती तशीच राखेसारखी धूळ होती. मी वर्गात बसताच इतर पोरे टकाटका बघतच राहिली. तानीमावशी परत फिरताच आपण तिच्या मागोमाग घरी पळत सुटावे असे मला वाटू लागले, पण पोरे हसतील म्हणून मी जागेला चिकटून राहिलो. मास्तरांचे नाव होते देशपांडे. ते नेहमी हातात छडी घेऊन हिंडत, व मध्येच कोणाच्या तरी पायावर सपकन् मारत; ते एक गणित घालत, व परसात जाऊन बिडी ओढून येत. पहिल्या दिवशी काहीच अभ्यास झाला नाही, शुद्धलेखन नाही, कविता नाहीत, काही नाही. मी परत येताना माझ्याबरोबर नारायण आणि रामचा आले. नारायणाच्या बापाचे किराणी दुकान होते तर रामच्याचा बाप शिंपी होता. दोघेही त्याच वर्गात दोन दोन वर्षे नापास झाले होते. दोनचार दिवसांतच मला त्या शाळेचा कंटाळा

आला. तेथे घरून लिहून आणायला सांगत नसत, त्यामुळे माझे अक्षर सुरेख आहे हे अजून कोणालाच समजले नाही; मात्र शुक्रवारी पाटीवर एक एक काढून सरस्वतीची पूजा करून गूळ फुटाणे वाटत असत.

आमच्या वर्गात मोहज्जन नावाचा एक दांडगा मुलगा होता. तो शाळेला येताना पाटीपुस्तके काही न आणता फक्त विटीदांडू घेऊन येत असे. सगळी मुले त्याला घावरत, त्याच्या पुढे पुढे करत. एकदा मधल्या सुट्टीत मी उगाच उभा होतो. तर बळवंत नावाच्या पोराने मला मागून मोहज्जनच्या अंगावर ढकलले. तेव्हा मी त्याच्यावर कोसळून त्याचे पाऊल तुडवले. तेव्हा मोहज्जन संतापला व त्याने काडकन माझ्या मुस्कटात दिली. थोडा वेळ माझ्या डोळ्यासमोर लालभडक झाले, व मी भिंतीला टेकून गप्पगार राहिलो . पण नंतर मात्र मला फार राग आला. माझी काहीच चूक नसता मी कशाला खाऊ मार? मोहज्जनलाच जर कोणी असे मागून ढकलले असते, तर त्याने काय केले असते ? पण बाकी सारी मुले बाजूला राहून हसत होती, व तो माकड्या बळवंत तर त्याच्यापुढे उड्या मारत होता. मी डोके खाली केले, आणि धावत जाऊन मोहज्जनच्या पोटात असे आदळले की तो खालीच पडला, व धापा टाकू लागला.

"अरे तू पोरगा आहेस की बोकड आहेस ?" तो उठत म्हणाला. मला वाटले, मला तो पुन्हा मारणार. म्हणून मी मुठी घट्ट धरून उभा होतो. पण तो म्हणाला, "पण तू पोरगा मात्र पक्का आहेस बघ. चल आपण आजपासून दोस्त झालो. तुला कुणी पुन्हा ढकललं तर सांग, त्याची पत्रीच करतो. पकड त्या डुकऱ्या बळवंत्याला-"

पण मी त्या जागी थांबलोच नाही. खरे म्हणजे मोहज्जन उठला, त्याच वेळी माझे पार थरथरू लागले होते. तो जर जोरात ओरडला असता तर मी पालीप्रमाणे धप्पदिशी खाली पडलो असतो. मी दप्तर घेऊन जो पळालो, तो थेट घरी आंगणात येऊन थांबलो. तानीमावशी सोप्यावरच केर काढत होती. तिने माझ्याकडे पाहिले व म्हटले, "संपली शाळा एवढ्यातच? काय झालं शाळेत ?"

कुठं काय झालं ? काही नाही. मीच लौकर आलो ग," मी दप्तर स्वैंपाकघरात अडवत तिची नजर चुकवत म्हटले. मग तिने चहा ऊन करून बरोबर अर्धी भाकरी खायला दिली, व ती कामाला लागली. रात्री जेवण झाल्यावर मी चटईवर पडलो, तेव्हा ती स्वैंपाकघरात काम करत असता मी पडल्या पडल्याच पाहत होतो. तिने खरकटी भांडी उचलून बाजूला ठेवली. अद्याप काम बरेच होते. पण ते तसेच अर्ध्यावर सोडून ती आली व माझ्याशेजारी बसली. तिने माझ्या तोंडावरून हात फिरवला, व म्हटले, "हं, आता सांग, काय झालं शाळेत? तुझा चेहरा लाल होता, आणि डोळे तर अगदी घाईला आले होते.' मग मला मात्र अगदीच राहवले नाही, व मी तिला सगळे भडाभडा सांगून टकाले.

"तुझा असला स्वभाव बघितला, की पुढं तुझं कसं होणार याचीच मला काळजी वाटते बघ." ती म्हणाली.

"मी तरी उगाचच मार कशाला खाऊ, तूच सांग तानीमावशी ?" मी म्हणाले.

"यावर तानीमावशी काय बोलणार ? तिचं तर तोंडच गेल्यासारखं झालंय," ती म्हणाली.

मला दोन सदरे होते. तानीमावशी एक दिवसाआड ते स्वतः धुऊन मला ते स्वच्छ देत असे. बाकीचे कपडे, भाऊरावांचे धोतर, त्यांचा टॉवेल, हे सारे तुळसाकडे जात असे, पण माझ्या कपड्यांना मात्र तिने तुळसाचा हात लावू दिला नाही. मी त्या दिवशी स्वच्छ सदरा घालून शाळेत गेलो. पण ते निंगूला पाहवले नाही. त्याचा स्वतःचा सदरा नेहमी पोतऱ्यासारखा असे, व पाटीला पाणी लावल्यावर तो ते ओच्याने पुसत असे. त्याने शाईची दौत घेतली व तिचे ओले बूच माझ्या पाठीवर दाबले. तेव्हा ढबू पैशाएवढा डाग उमटून आत अंगाला देखील शाई लागली. मी रागाने उरलेली शाई पच्चदिशी त्याच्या अंगावर टाकली खरी, पण माझा सदरा खराब झाला याची मात्र मला फार हुरहुर लागली. घरी येऊन मी तानीमावशीसमोर उभा राहिलो तर मला डोळ्यांतले पाणी आवरले नाही. तिने सदरा काढून पाहिला, व ती काळजीने गप्प झाली.

"आता रे कसं ? तुला तर दोनच सदरे आहेत. झट्दिशी दुसरा शिवावा म्हटलं तर माझ्याजवळ चार आणेदेखील नाहीत. येऊ नये इतकं घरात येतं, पण घराला एक वाळवीच लागून बसलेय नव्हे ?"

ती सदरा हातात घेऊन बराच वेळ बोलत राहिली. मी तर थंडीने काकडू लागलो. ते नंतर तिच्या ध्यानात आले,





अनुक्रमणिका

व तने एक जुनी धाबळी माझ्या अंगावर टाकली. "हे बघ, मी हे आताच्या आता पाण्यात भिजत घालते. मग चिंच घासून धुतलं की जाईल डाग," ती उत्साहाने उठत म्हणाली.

तिने सदऱ्याचा तेवढाच भाग पाण्यात भिजवला, व त्यावर चिंच लावून तिने तो अर्धा तास घासला. डाग जरा फिकट झाला खरा, पण अजूनही तो पाठीवर वाघाच्या डोळ्यासारखा दिसत होता.

"आता पुढे रे ?" ती खाली बसत म्हणाली.

मी तरी पुढे काय सांगणार ? म्हणून मीदेखील म्हणालो, "पुढं काय ग तानीमावशी ?"

ती थोडा वेळ विचार करत बसली. नंतर तिने हसून एकदम चुटकी वाजवली. "आपण असं करू. सदरा तसा जुनाच आहे. तेव्हा तो डाग तेवढा सरळ कापून टाकू. मग त्या ठिकाणी माझ्याजवळ एक पांढरे कापड आहे, त्याच्यावर फुलपाखराची चित्रे आहेत, त्याचा एक तुकडा मी शिवून देते. कसं ?" ती म्हणाली.

पाठीवर चित्र असलेला सदरा म्हणताच मला फार गंमत वाटली. भाऊराव त्या दिवशी लौकरच आले. तानीमावशीने त्यांचे ताट एकदमच सगळे वाढून त्यांच्यापुढे ठेवले, व ती त्यांना विसरून गेली. मग ते कपडे करून पुन्हा बाहेर पडले. ते कोठे जाणार म्हणून तानीमावशीने विचारले नाही, केव्हा येणार हे त्यांनी सांगितले नाही. मग तानीमावशी सुई, दोरा, कात्री घेऊन चिमणीपाशी बसली. चिमणीतून सारखा धूर येत होता, व मला मधून मधून पेंगल्यासारखे होत होते. तिने मला गदागदा हलवून उठवले, व म्हटले, "बघ तरी, कसा अप्रूप झाला आहे तुझा सदरा !"

मी खाडकन् जागा झालो. सदऱ्यावर लाल पंखांचे फुलपाखरू बघून तर तो घालून मी केव्हा शाळेत जातो असे मला झाले. तानीमावशीचे डोळे जागरणाने लालसर झाले होते, व ती दमली होती. ती तशीच जमिनीवर आडवी झाली. मी म्हटले, "अग, असं का ! जाजमावर झोप की सरळ."

"कशाला आता ? आणखी तासातच तर पुन्हा जुंपायचं आहे घाण्याला," श्वास सोडत ती म्हणाली.

मी शाळेत जाताच नारायण ओरडला, "अरे, तुझ्या पाठीवर फुलपाखरू बसलंय !" चिंतामणी देखील म्हणाला, "होय रे होय, थांब, मी त्याला पकडतो." तोपर्यंत आणखी दोन पोरे आली. मला तर हसूच आवरेना. मी म्हटले, "घ्या, कोणीही पकडून त्याला काड्याच्या पेटीत ठेवा. अगदी घट्ट ! मग ते सोन्याचं होईल !" पण ते फुलपाखरू चित्रातले आहे म्हणताच ती पोरे खुळीच झाली. चिंतामणीने विचारले, "असलं फुलपाखरू कुठं मिळतं ?" मी आपले दडपून सांगितले की ते श्रीपूमामाने मुंबईहून आणले आहे. "मग मला देखील आणून दे की आणखी एक !" तो तोंड पसरत म्हणाला.

माझे फुलपाखरू सगळ्यांनी हात लावून पाहिले म्हणताच तानीमावशी फार खूष झाली. पण त्यानंतर मोहज्जनने आपल्या सदऱ्यावर पुढच्या बाजूला झाडाचे मोठे चित्र असलेला तुकडा लावला. चिंतामणीने मुलींच्या परकरावर असतात तसले एक फूल बिल्ल्याप्रमाणे सदऱ्याच्या खिशावर शिवून घेतले. पण खरी कमाल बळवंतने केली. त्याला फूल, झाड असले काहीच मिळाले नाही. पण त्याच्या गंजीफ्राकवर वाघाचे चित्र होते. तेव्हा तो एक दिवस नुसता गंजीफ्राकच घालून शाळेत आला. तेव्हा देशपांडे मास्तर छडी घेऊन त्याच्या मागे लागले, त्या वेळी बळवंत वाघ इकडे तिकडे पळू लागलेला पाहताच आम्ही हसून हसून बेजार झालो. मी पळत घरी आलो, व दप्तर सोप्यालाच टाकत ओरडलो, "तानीमावशी, बाहेर ये. तुला एक गंमत सांगायची आहे."

ती कसले तरी पीठ चाळत होती. ती पांढऱ्या हातानेच बाहेर आली व माझ्या शेजारी बसली. मग मी तिला सगळी हकीकत सांगितली. तेव्हा तर ती मला पांढऱ्या हातानेच ढकलत ढकलत लहान मुलीप्रमाणे खिदळू लागली. त्या वेळी मला तानीमावशी एकदम निराळी लहानसर दिसली. हसताना तिच्या हनुवटीवरील गोंदणे स्वच्छ ताणून चमके. ती इतकी हसली की हसून तिचे डोळे ओलसर झाले. पण तिचे पिठाचे हात मला ठिकठिकाणी लागून पीठ ती चाळत नसून मीच चाळत असल्याप्रमाणे दिसू लागलो. तसे मी म्हणताच तर तिने मला जोराने ढकलले, व ती खाली पडून हसत राहिली. मला वाटले, आता तानीमावशी अगदी लहान मुलीप्रमाणे हसते, खेळते. मग खरोखरच लहानपणी ती कशी असेल बरे ?



अनुक्रमणिका

मला त्या वेळी सुम्मीची एक गंमत आठवली. मी म्हटले, "एकदा सुम्मीने देखील-"

सुम्मीचे नाव काढताच तानीमावशी एकदम विझल्यासारखी झाली, आणि तिच्या हनुवटीवरील दाणा वाळलेल्या मुगासारखा दिला. तिने गप्पकन् माझ्या तोंडावर हात ठेवला.

"तिचं नावसुद्धा काढत जाऊ नकोस माझ्यापुढे !" ती म्हणाली.

"का ग ? इतका तिच्यावर तुझा राग होता ?"

"राग नव्हे रे," माझ्याकडे न पाहता ती म्हणाली, "आमच्या लहानपणी गणपतीच्या आरतीसाठी ताम्हणात रांगोळी काढावी लागे. त्या वेळी कमळी ताम्हण घासून लालभडक करून त्यात पातळ गंधाची रांगोळी दुर्वांच्या टोकाने काढत असे, आणि शेवटी मग तिच्यावर अगदी नाजूक अशी श्री काढायची. नंतर तिला सुम्मी झाली तीदेखील तसल्याच श्रीसारखी-कोवळी, शांत वासाची ! त्या पोरीची आठवण झाली की अंग एकदम कोळसा झाल्यासारखं वाटतं. म्हणून म्हणते ते नाव माझ्यापुढे काढू नको, खेळता खेळता भुताची खोली उघडू नको."

त्याच शनिवारी शेजारच्या हरेश्वरला सहल काढण्याचे देशपांडे मास्तरांनी ठरवले, व प्रत्येकाला चार चार आणे आणायला सांगितले. श्रीपूमामाने दिलेल्या पैशांपैकी माझ्याजवळ फक्त दहा पैसे उरले होते, पण खरे म्हणजे आधी मला त्या पोरांबरोबर कुठे जायचेच नव्हते म्हणून मी म्हटले, "मी येत नाही, माझ्याजवळ पैसे नाहीत." तर मास्तरांनी उगाचच माझ्या पायावर छडी मारली, व म्हटले, "तू काय इतका भिकारडा आहेस की काय ? भाऊराव तर हातावर चवली पडल्याखेरीज दवाखान्यातलं फुकट औषधदेखील देत नाही की ! जा, आणि मुकाट्याने पैसे आण, नाहीतर उद्या या शाळेत पाऊल ठेवू नकोस."

"मी सहलीला येणार नाही, माझ्याजवळ पैसे नाहीत," मी पुन्हा पण जास्त जोराने म्हणालो. तेव्हा मास्तर मोहज्जनला म्हणाले, "अरे त्या बाजीरावाला उचल, आणि बाहेर फेकून दे."

मोहज्जन सावकाश उठला, पण माझ्याकडे येताच त्याने मला जाण्याची खूण केली. माझा चेहरा एकदम तापला, व डोक्यात भणभणू लागले. मी दप्तर गुंडाळले, व ताड्ताड् भर उन्हात बाहेर पडलो. तेव्हा मोहज्जनने एकदम गडबड केली, व जणू मला धरण्यासाठीच तो दारापर्यंत धावला. तोपर्यंत मी रस्त्यावर होतो. त्याने मला हाक मारली, पण मी मागे वळूनदेखील पाहिले नाही.

तानीमावशी दुपारचे काम करून आडवी झाली होती. माझ्या तोंडाकडे पाहताच तिने मला बाजूला बसवून घेतले, म्हटले, "असं उन्हातान्हातून का आलास ? आणि रडायला काय झालं ? तू आता मोठा झालास, याहून मोठा होणार, असं रडत राहिलास तर मग पुढे काय करणार ?"

"मग त्यांनी भिकारडा का म्हणावं मला सगळ्या वर्गात ? माझं अक्षर सगळ्या वर्गात चांगलं आहे, माझ्याइतक्या कविता कुणालाच पाठ म्हणता येत नाहीत, मग त्यांनी मला भिकारडं म्हणावं ?"

तानीमावशी थोडा वेळ गप्प राहिली. नंतर ती म्हणाली, "तू दुपारी कधी त्या वडाच्या सावलीत झोपला आहेस ? असल्या उन्हात त्या ठिकाणी इतकं शांत वाटते म्हणतोस ! जाऊ या आता ?"

मी संध्याकाळी पुष्कळदा त्या ठिकाणी जात असे, तेथल्या पारंब्यांचा झोका करत असे. पण दुपारी कधी तेथल्या गवतावर आडवा झालो नव्हतो. आम्ही त्या ठिकाणी आलो. तानीमावशी तशीच बसली, पण मी मात्र गवतावर पसरलो. तेव्हा झाड उघड्या छत्रीप्रमाणे एकदम वर गेले आणि आभाळापर्यंत पोहोचले. ऊन तुकड्यातुकड्यांनी अंगावर आले, आणि एक लहान तुकडा तर माझ्या डोळ्यातच शिरून चमकू लागला. मला वाटले, आता आपल्याला अंगच नाही, ते गवतातच विरघळले आणि हा कोण पोरगा आरामात येथे पडला आहे असे वाटून हे झाड म्हाताऱ्या दाढीवाल्या आजोबासारखे आपल्यावर वाकून पाहत आहे.

पण मध्येच मास्तरांनी आपल्याला हाकलून घातले हे मला आठवले, व मी तानीमावशीला म्हटले, "पण मला हाकलून का घालावं शाळेतून ?"

"त्यांचं म्हणणं थोडं खरं आहे. काही पेशंटकडून दोनदोन चारचार आणे येतात. पुष्कळजण खुशीने देखील देतात. सगळा पैसा घरीच आला असता, तर आपलं काही वाईट नाही. पण दैव देते आणि कर्म नेते अशी आपली स्थिती ! तू इथं येऊन इतके दिवस झाले. मी



अनुक्रमणिका

तुझ्याकरिता काहीतरी गोड केलं आहे का सांग ?'' बोलता बालता ती एकदम गप्प झाली.

आता मला एकदम भीती वाटू लागली. मला वाटले, आता तानीमावशी कोठून तरी चार आणे मागून आणणार, व सहलीला जा म्हणून मला सांगणार ! मला भटकायला खूप आवडते, पण त्या पोरांबरोबबर मात्र मला जायचे नव्हते. आणि आता देशपांडे मास्तर असताना तर अगदी शपथ ते नको होते.

''हे बघ, ती तुझी सहल गेली मसणात !'' तानीमावशी एकदम म्हणाली, ''तू आणि मीच जाऊ या एकदा हरेश्वरला ! तिथं देखील कधी तरी मोर दिसतात. आपण एक लहानशी एक्का गाडी करू मग कसं असावं माहीत आहे ? बरोबर पुष्कळ भाकऱ्या, आणि भरल्या मसाल्याची वांग्यांची भाजी !''

मी एकदम उठून बसलो, आणि म्हणालो, ''आणि खूप दही देखील ?''

तिने मान हलवून म्हटले, ''होय. अगदी मडकं भरून घट्ट दही. तुला एक मडकं, आणि मला एक स्वतंत्र मडकं. नाही तर तू खादाड, माझं देखील दही तू खाऊन टाकशील. शिवाय डांगराचं पीठ.''

''डांगराचं पीठ ? म्हणजे काय ?''

''तुला अद्याप डांगराचं पीठ माहीत नाही, खुळ्या !'' मला चापट मारत ती म्हणाली, ''ते एक पीठच. त्यात दही घालावं, बारीक चिरलेले कांदे अणि बरोबर कोवळ्या मिरच्या.'' माझ्या तोंडाला तर पाणीच सुटू लागले. मी तिचा हात गच्च धरला, व म्हटले, ''मग करवंद अगर चिंच घातलेली झकास चटणी हवी.''

''होय तर, चटणीशिवाय कसली रे भाकरी ?'' तानीमावशी देखील गवतावर आडवी होत म्हणाली, ''देवळाजवळ मोठं तळं आहे, पण पाणी गुडघाभर, वाटेल तेवढं त्यात खेळावं. अणि देवळाच्यामागे झरा आहे. तिथलं पाणी घ्यायचं म्हणजे भांड्यातून नाही. तर वाजूला पालथं पडायचं व ओंजळी ओंजळीनं पाणी घ्यायचं. जाताना वाटेत आंब्याची झाडं आहेत. त्यांना पानापानाबरोबर कैऱ्या लागतात. त्या फोडून आत मीठ, लाल चटणी घालून खायच्या हां, कैऱ्या खाताना चटणी हिरवी चालायची नाही, लालच पाहिजे बरं का !''

''पण ते आंबे आपले म्हणून कोणी रागावत नाही !'' मी अविश्वासाने विचारले.

''अरे त्या रानात कोण कोणाचे आंबे ? ढीगभर पडून वाया जातात. पण पडलेले आंबे खाण्यात गंमत नाही. झाडावरून तोडलेला आंबा हाताला कसा उबदार लागतो, माहीत आहे ? कमळी तर लहानपणी कैऱ्यांसाठी जीव टाकायची, पण तिला झाडावर चढण्याचं धैर्य नव्हतं. मग झाडं धुंडाळत परकर खोचून वर चढायचं हे एक मला कामच होऊन बसलं ! आणि मग मी आणून दिलेल्या कैऱ्या खाऊन झाल्यावर उलट मलाच ती जंगली म्हणत चिडवत राहायची. असली बघ तुझी आई झगडघंटी -'' तानीमावशीने माझ्या डोक्यावर चापट मारली, व ती मोठ्याने हसली.

सुम्मीचे नाव काढताच खाडकन् गप्प राहणारी तानीमावशी आईविषयी मात्र इतक्या मनमोकळेपणाने बोलत आहे याचे मला फार नवल वाटले. जणू आई आता या वेळेला घरातच कैऱ्या खात बसली आहे ! आईच्या लहानपणाच्या हकिकतीविषयी मला काहीच माहिती नव्हती. आई बोलत बसायची ते दादाशी, सुम्मीशी, आमच्याशी नाही. मी म्हणजे घरातले लोणचे ! पण परकर खोचून झाडात आंबे तोडत हिंडणारी तानीमावशी त्या वेळी कशी दिसत असेल, याचे चित्र पाहण्याचा मी प्रयत्न करू लागलो. नंतर बराच वेळ तानीमावशी काहीच न बोलता गप्प होती. पण मी एकदम जागा झाल्याप्रमाणे तिच्याकडे पाहतच राहिलो, कारण आता ती एकदम हुंदके देऊन रडत होती. मी म्हटले, ''अग गाडीबिडी करायचं खर्चाचं असलं, तर आपण जाऊ या नको. राहिलं. मला हरेश्वर नको, काही नको.''

ती चटकन उठून बसली, व तिने माझा दंड पकडला. ती म्हणाली, ''हे बघ, असं कधी म्हणत जाऊ नको. असा जर दरवेळी हात मागे घेऊ लागलास, तर आयुष्यभर तुझे हात रिकामेच राहतील. सरळ मिळालं नाही, तर ओरबडून घ्यायची तयारी पाहिजे. गाडी मिळाली तर बरंच झालं, नाहीतर तू आणि मी चालत जाऊ. आहे तर सारे सात आठ मैल. वाटेत कुठेतरी मोटवणीजवळ बसून गूळ शेंगदाणेदेखील खाऊ. देऊळ, तळं, वाटेवरची कैऱ्यांची झाडं, थंडगार पाणी, ही तर काय कोणाच्या बापाची नाहीत ना ? होय की नाही ?''

मी लगेच म्हटले, ''छट्, ती काय कुणाच्या बापाची असणार ?''

''एवढंच वाटलं बघ, मी कधी देवाकडे फारसं मागितलं नाही. पण जे अगदी थोडं मागितलं, ते देखील त्यानं दिलं नाही, म्हणून मला त्याचा पुष्कळदा राग येतो. मला काय घोडागाड्या, वाडा, अंगावर पासरीभर सोनं पाहिजे होतं ? पोटापुरतं खायला असावं. एखादुसरं पोर असावं स्वतःचं, आपला म्हणता येईल असा संसार असावा. एवढ्यावरच मी बाभळीच्या झाडाप्रमाणे आनंदाने टिकले असते. डोकंभर प्रकाश, पाऊलभर ओल. बस्स, एवढ्यावरच ते झाड समाधानाने जगतं, वाढतं. मला एकदा हे सगळं मिळालं देखील होतं. पण इथं आले, आणि जी कीड लागली ती अगदी मुळासकट!''

काल तानीमावशी लहान मुलगी होऊन मला कोपराने ढकलत हसत होती. आता तिने मलाच आपल्याएवढे मोठे केले होते. मी श्रीपूमामाच असल्याप्रमाणे ती बराच वेळ बोलत होती. ती पुष्कळ बोलली. त्यातले मला बरेच समजले नाही हे खरे, पण सगळे मला समजत असल्याप्रमाणेच मी हूं हूं करत होतो.

नंतर ती हसली, व नेहमीची तानीमावशी झाली. ती म्हणाली, ''हे बघ, ऊन आता उतरलं आहे. आज कशी झाली तरी शाळा चुकलीच. तेव्हा कुठंतरी जाऊन फिरून ये. फार दूर जाऊ नको. हा रस्ता सरळ नाथाच्या देवळाला जातो, तेथून वळलास की वाटेत ओढा लागतो. मग ओढ्यातूनच सरळ वर ये. जा, बसून राहू नको असे घुत्तासारखं ! हां, त्या राजेसाहेबांच्या विहिरीकडे एकटं जायचं नाही. गेलास तर पायांची कांडं करून देईन बघ उसासारखी !''

मी त्यावर उडीच मारली. मी त्या रस्त्याने कधी गेलोच नव्हतो. पुष्कळदा पारप्पा धनगर त्या रस्त्याने आपल्या मेंढ्या घेऊन जात असे. धूळ उडयिची, व तिच्यात मग मेंढ्या वितळून जात, पण नंतर बराच वेळ बें बें असा त्यांचा आवाज मात्र ऐकू येत असे. पारप्पा एकदा सांगत होता, वाकड्या टोकाच्या उंच काठीने पाला काढायचा एवढेच काम. मग टेकड्या ओलांडत भटकायचे; भटकायचेच भटकायचे ! मला फार वाटत असे, आपण देखील दोन भाकरी बरोबर घ्याव्यात, आणि एका रविवारी पारप्पा बरोबर संध्याकाळपर्यंत फिरून यावे. मी तानीमावशीला विचारले तर ती इतकी हसली, की मला तेथून पळूनच जावे असे वाटू लागले.

''वेडा की काय तू ? मेंढरापाठीमागून आणखी एक दोन पायांचं मेंढरू !'' मला कोपर मारत ती म्हणाली, ''आधी बें बें करायला शीक दोन दिवस मेंढ्यांच्या शाळेत जाऊन !'' ते ऐकून मलाही हसू आले होते.

मी उठलो, व दवाखान्याबाहेर पडलो. मी वळेपर्यंत तानीमावशी पाहात उभी होती, मग ती घरात गेली. मी अद्याप एकटाच कोठे बाहेर पडलो नव्हतो, त्यामुळे प्रथम मला नवीन वाटले, पण मग संध्याकाळच्या वाऱ्यात अंग भुरभुरले व नुसते पळत सुटावे असे वाटू लागले. नाथाच्या देवळातील घंटा जवळ ऐकू येऊ लागली. पण आज मी देवळात गेलो नाही. देवळात कधी काही फारसे बघण्याजोगे नसतेच, आणि तेथे माणसे उगाचच घंटा फार वाजवतात. देवळामागे ओढा होता, पण तो येथेही घराजवळच्याप्रमाणे कोरडाच होता. एका ठिकाणी दोन मुली वाळूत खळगा काढून वाटीने पाणी भरत होत्या. मी देखील गुडघाभर वाळू खसाखसा बाजूला केली. प्रथम वाळू थोडी ओली झाली, व नंतर थंडगार स्वच्छ पाणी साचले. मला वाटले, तानीमावशीबरोबर येथे देखील एकदा आले पाहिजे. भाकरीला जाड लोणी माखावे, त्यावर लालसर लसूण चटणी पसरावी, आणि मग ताजे पाणी काढून येथल्या येथेच ते प्यावे. मुली निघून गेल्यावर एकदम सारे रिकामे झाले. मी वाळूतूनच पुढे आलो. आता वळल्यावर दूर दवाखान्याची विहीर देखील दिसायला लागली होती.

समोरच झाडांमधून राजेसाहेबांची विहीर दिसत होती. मला वाटले, तिकडे एकदा जाऊन यावे. फक्त पाच मिनिटे. कुणास ठाऊक, आज मला एकट्याला देखील मोर दिसतील आणि तो देखील एक मोर नव्हे, तर पाचपंचवीस ! पण लगेच मला तानीमावशीचे शब्द आठवले- एकटा गेलास तर पायांची कांडे करून देईन ! तानीमावशी काही पाठीत एक घुमकादेखील घालायची नाही, हे मला माहीत होते. पण जायला भीती वाटली खरी. मी विचार केला, मी विहिरीकडे कुठं जातोय ? मी तिच्यापासून लांब राहून फक्त मोर पाहणार आहे. एवढ्यात माझे पाय ओढा ओलांडून झाडांच्या हिरव्या

सावल्यात येऊन पोहोचले होते. मी अगदी गप्प राहून सगळीकडे पाहिले, पण कुठेच मोर दिसले नाहीत. खाली पडलेल्या फुलांत मात्र एक भारद्वाज ऐटीत एकेक पाऊल टाकत काही तरी वेचत होता. मी आल्यावर त्याने एक लाल डोळा माझ्यावर रोखला, व तो झाडावर चढला. मग दोन बदामी पंख पसरून तो काळेपणाने उडून गेला. मी आता समोरच्या झुडपामागे एकदा पाहून घरी परतणार होतो. पण माझा हात झुडपात तसाच राहिला. पलीकडे बांधावर दोनचार झाडे होती. एवढ्या अंतरावर देखील मी त्या दोघांना ओळखले. भाऊराव तेथे बसले होते, आणि त्यांच्या समोरची बाई नक्कीच तुळसा होती. आता तिच्या डोक्यावर पदर नव्हता. ती हसत होती, व भाऊरावांना पान देत होती. आता माझे पायच एकदम गेले. समोर दवाखाना अगदी जवळ होता, पण मला तिकडे त्यांच्या समोरून जाववेना. मी उलट रस्त्यानेच धावत परत आलो, व बाहेर कट्ट्यावर बसलो. काही वेळाने तानीमावशी बाहेर आली, ''अरे देवा, केव्हा येऊन बसलास रे तू चोरट्याप्रमाणे ? आणि पळत यायची काय एवढी घाई होती ?'' ती प्रेमाने माझे केस विसकटत म्हणाली.

मी आत गेलो व माझ्या अंथरुणावर जाऊन पडलो. मला तिच्याकडे मान वर करून बघवेना. पण तिला समोर बघितल्यावर सगळे सांगितल्याशिवाय राहवेना.

''थू काय बघितलंस, हे शाळेत कुणाला सांगू नको, बरं का ?'' तानीमावशी म्हणाली. तिचा चेहरा एकदम उतरलेला शिळा दिसला. मग मात्र मला वाटले, आपण हे तिला सांगायला नको होते. ती त्याआधी कशी स्वच्छ दिसत होती-आता ती एकदम आजारी असल्याप्रमाणे वाटत होती.

दुसऱ्या दिवशी, शनिवार, सकाळची शाळा होती. तानीमावशीने मला उठवले, व आंघोळ करायला सांगितले. मला तर आता त्या शाळेत पाऊलदेखील टाकायचे जिवावर आले होते. तानीमावशी केस विंचरून आंघोळ करून तयार झाली होती. मी कपडे घालत असतानाच तिने मला बाहेर ढकलले, व म्हटले, ''चल, मला परत यायचे आहे लौकर.''

ती झपाझप चालत असता आवार संपेपर्यंत मी तिच्या मागून उड्याच मारत गेलो. ती थांबली व मागे वळून पाहतच राहिली. ती म्हणाली, ''तू काय एखादी बेडकी होऊन बसलास की काय रात्री ?''

''अग, मी तरी काय करू ? तूच एकदम मला बाहेर ढकललंस की मी कपडे घालत असता ! तेव्हा चड्डीच्या एका पायात दोन्ही पाय गेले बघ.'' मी म्हणालो. मी चड्डीचा मोकळा पाय उजव्या हातात धरला होता. ते पाहून ती एकदम मोठ्याने हसायला लागली, पण त्यामुळे मला सुद्धा फार बरे वाटले.

''मग घाल तरी ती सरळ आता !'' ती म्हणाली. पण ती आता सरळ घालायची म्हणजे पुन्हा काढून घालण्याखेरीज शक्य नव्हते. ''पण रस्त्यावर कशी काढू ग ?'' मी म्हटले.

पण त्यावर आता मात्र तिने खरोखरच एक हलकासा घुमका माझ्या पाठीत घातला, व आवाराच्या भिंतीतील एका खांबाकडे बोट दाखवून ती पुढे चालू लागली. पण ती अद्याप स्वतःशीच हसत होती. मी त्या आडोशाला झटकन चड्डी सरळ घातली, व धावत तिच्या मागोमाग गेलो.

शाळा भरली होती, पण देशपांडे मास्तर दारातच छडी घेऊन उभे होते.

''पैसे आणलेस काय रे ?'' त्यांनी दरडावून विचारले. त्यावर मी काही बोललोच नाही तरी तानीमावशी मला म्हणाली, ''तू गप्प बस. मध्ये बोललास तर पाय मोडीन.'' तिचा आता अवतार बघून मी देशपांडे मास्तरपेक्षा तिलाच जास्त घाबरलो. ही कुठली दुर्गाई मरगाई तानीमावशी समोर आली कुणास ठाऊक !

''नाही, मी सांगते तुम्हांला,'' पुढे सरसावत तानीमावशी म्हणाली, ''आणि कुणाला भिकारडा म्हणता तुम्ही भर वर्गात ?''

''चार आणे देण्याची ऐपत नाही, तर तोंड तरी कशाला करता इतके ?'' देशपांडे फार उद्धटपणे म्हणाले. सगळ्या पोरांनी पाट्या खाली टाकल्या व दारात ढिम्म गर्दी झाली.

''तुम्ही तोंड सांभाळून बोला. तुमच्या झुरळासारख्या मिश्यांना घाबरणारी बाई नाही मी. कमिटीच्या वशिल्यानं मास्तर होऊन बसलात. कधी शाळेत पाढे नाहीत, परवचा नाही, काय शाळा आहे की धर्मशाळा आहे ? म्हणे सहल काढतो ! उद्या नाटकं करा पोरांपासून पैसे उकळून. हरेश्वरलाच जायचं, तर काय आमचे आम्हांला पाय

नाहीत ? त्याला तुमची चार आणेवाली मिरवणूक कशाला पाहिजे बरोबर ?''

हातवारे करत तानीमावशी जोराने बोलत होती, पोरे तर टकाटका पाहातच राहिली. पण तानीमावशीचे अद्याप संपले नव्हते.

''तुम्हांला चार वाक्ये तरी सरळ वाचता येतात का ? ऐका-ध्यायेदाजानुवाहुं धृतशरधनुपं बद्धपद्मासनस्थं, पीतं वासो वसानं नवकमलदलस्पर्धिनेत्रं प्रसन्नम् !- हे मी तुम्हांला एका कागदावर लिहून देते, न चुकता एकदा वाचून दाखवा, मग म्हणा दुसऱ्याला भिकारडा ! तुम्ही कधी शिवलीलामृत अध्याय ऐकला तरी आहे का ?

माथा जटांचा भार । तृतीय नेत्र वैश्वानर । शिरी झुळूझुळू वाहे नीर। अभयंकर महाजोगी ॥ चंद्रकळा तयाचे शिरी । नीळकंठ खट्वांगधारी । भस्म चर्चिले शरीरी । गजचर्म पांघुरला ॥ नेसलासे व्याघ्रांबर । गळा मनुष्यमुंडांचे हार । सर्वांगी वेष्टित फणिवर । दशभुजा मिरवती-''

तानीमावशीने तेथल्या तेथे सारा अकरावा अध्याय त्यांना खात्रीने म्हणून दाखवला असता. पण त्यावर आत जाता जाता देशपांडे मास्तर म्हणाले, ''तू बाई जर एवढी शंकराचारीण आहेस, तर त्या पोराला आणलंस कशाला शाळेत ? तूच शिकव त्याला घरी चुलीपुढं बसवून !''

पोरांना गबागबा ढकलून तानीमावशी आत शिरली. आणि म्हणाली, ''तू, तू बाई असं एकेरी बोलू नका मास्तर ! जा, मीच शिकवीन त्याला. तू, तुझी शाळा आणि सहल ढुंगणात घालून घे. टाक माझ्या पोराचा दाखला आत्ताच्या आत्ता !''

रस्त्याने कमिटीचे महादू पाटील चालले होते. त्यांनी नेहमीप्रमाणे जरीचा रुमाल काखेत मारून आपले पांढरे केस उघडे टाकले होते. सगळा गोमगाला ऐकून ते आत आले, व म्हणाले, ''कंपाऊण्डरीण बाई, काय झालं एवढं?''

''तर हा मास्तर मला भिकारडा म्हणतो. शाळेत पोराला कशाला आणलं म्हणतो. शाळा काय कुणाच्या सासऱ्याची दौलत आहे काय ?''

पाटील देखील थोडे दचकलेच. ते म्हणाले, ''बरं बाई, तुम्ही घरी चला. मी पाहून घेतो सगळं.''

''मला आत्ताच्या आत्ता दाखला पाहिजे.'' पाय आपटीत तानीमावशी म्हणाली. मी एकदम घाबरलो. आता या शाळेत यायचे म्हणजे माझ्या जिवावर आले होते खरे, पण दाखला काढायचा म्हणजे शाळाच बंद. मग पुढे काय ?

पाटील म्हणाले, ''मी स्वतः संध्याकाळपर्यंत तुमचा दाखला आणून देतो. मग तर झालं ना ? आता चला घरी.''

मग तानीमावशी सैल झाली. तिने मला हाताला धरले व आम्ही परतू लागलो. थोड्या वेळाने मोहज्जन धावत मागून आला, व त्याने शाळेतच राहिलेली माझी दौत मला दिली. ''सहलीला कोण जातंय बच्चतो, त्याची पत्रीच करतो बघ,'' तो मला म्हणाला. पण मग आम्हाला काय बोलावे हेच सुचेना. मी मुकाट्याने निघून गेलो व मोहज्जन परत शाळेत गेला.

''तानीमावशी, आता पुढं ग ?''

''तू घावरू नकोस. आणखी एक शाळा आहे. जरा लांब आहे येथून मैल दीड मैलावर. तुला सवय होईपर्यंत मी येत जाईन तुझ्यावरोबर. बसू दे तो माकड आपली शाळा घेऊन !''

मग सोमवारी सकाळी लौकरच आम्ही निघालो. या नव्या शाळेकडे जायचे म्हणजे कुंभार आळीनागच्या वाटेने बाहेर जावे लागत होते. वाटेतच डुकरे बसली होती आणि पायाने डिवचल्याखेरीज बाजूला सरकत नव्हती. एक मोठे कुत्रे वस्कन आमच्या अंगावर ओरडले, तेव्हा तानीमावशीने त्याला एक दगड मारला. आम्ही बाहेर पडलो तेव्हा माझे पाय दुखायला लागले. आता वाट रंगीत पट्टीप्रमाणे टेकडीवर चढली होती. तानीमावशी देखील आता धापा टाकू लागली होती. ती मध्येच थांबली व म्हणाली, ''ही टेकडी मागे टाकली, की तुझी नवी शाळा आलीच बघ.''

पण आम्ही टेकडी उतरून आलो तरी शाळा कुठे दिसेचना. ''अरे, ती नव्हे काय समोर ?'' तानीमावशी बोट दाखवत म्हणाली.

समोर गवताचे छप्पर असलेली मोठी जागा होती. तसली शाळा बघितल्यावर मी लगेच तानीमावशीला म्हणणार होतो, मला असली शाळा नको. पण मी गप्प राहिलो. आम्ही तेथे गेल्यावर मास्तरच पुढे आले, व त्यांनी दोन पोरांना उठवून तानीमावशीला बसायला जागा

दिली. तिने मास्तरांना सगळी हकीगत सांगून टाकली. मास्तरांनी कोट घातला नव्हता, त्यांच्या अंगात लांब हाताचा, कॉलर नसलेला सदरा होता व त्यातून त्यांची बारीक मान वर आली होती. त्यांच्या टाचा तानीमावशीप्रमाणेच फुटल्या होत्या.

"आमची शाळा अगदी नवीन आहे, लहान आहे. हा मुलगा आला तर बरेच होईल," मला जवळ बोलावत मास्तर अतिशय सावकाशपणे म्हणाले. मग तानीमावशी हसली व परत जायला निघाली.

तो दिवस कसा तो संपेना. एकाच ठिकाणी पहिलीपासून चौथीपर्यंत पोरे होती. एका कोपऱ्यात मडक्यात पाणी होते, तरी सगळी पोरे पच्चदिशी पाटीवर थुंकत. मास्तर चौथीच्या पोराकडे गेले, की पहिलीची पोरे पाटीवर गुणिले शून्याचा खेळ खेळत. एकदा बाहेरून एक रेडकू आले, आणि सगळ्यांना ढुशा देऊन मडक्यात तोंड घालून गेले. मी खाली बघत काही तरी लिहू लागलो, की कोणी तरी पटदिशी माझ्या डोक्यावर खडा मारत असे. संध्याकाळपर्यंत मी अगदी रडकुंडीला आलो. मला वाटले, श्रीपूमामा येईल आणि मला घेऊन जाईल तर बरे होईल. तानीमावशी फार चांगली आहे खरे, पण मला असली शाळा नको. मी मनातल्या मनात त्याला पत्रदेखील लिहू लागलो- मला येथे फार कंटाळा आला आहे, मला घेऊन जा. तानीमावशीला देखील घेऊन जा. ती एकटीच रडत बसते, पण मी हे बघितले आहे म्हणून तिला सांगू नको. तिला देखील येथे फार कंटाळा आला आहे...

मग शाळा सुटली. इतर पोरे भराभरा पळाली. मला एकट्यालाच तेवढे टेकडी ओलांडून या बाजूला यायचे होते. आधी येतानाच माझे पाय भरून आले होते आणि त्यात कुंभाराच्या आळीमागून जायचे म्हणजे माझ्या अंगावर काटाच आला. मला अजून डुकरांची सवय झाली नव्हती. तोच "सुटली होय रे शाळा ?" असा तानीमावशीचा आवाज ऐकू आला. ती दूर एका निंबाच्या झाडाखाली बसली होती. तो आवाज ऐकताच माझा कंटाळा एकदम धुऊन गेला, व थंडीत गरम कोट घातल्यासारखे वाटले. मी मनातल्या मनात श्रीपूमामाला लिहिलेले पत्र फाडून टाकले, व तिचा हात धरत म्हटले, "हं, चल आता लौकर."

'अरे, अरे थांब, मला एवढं चालायची सवय नाही." ती गुडघे दाबत उठत म्हणाली, "तुझे देखील पाय गेले की नाही आज, खरं सांग ? आता घरी गेल्यावर खोबरेल लावून गरम पाणी ओतून घेऊ पायांवर."

घरी गेल्यावर सगळे ठीक होईल हे खरे, पण आता जड पिल्याप्रमाणे पाय घेऊन जायचे कसे, हे मला समजेना. आम्ही परतलो त्या वेळी संध्याकाळ झाली होती. वडाच्या मागे लालभडक रेशमी पडद्याप्रमाणे प्रकाश दिसत होता, आणि काळ्या पारंब्या त्यावर उभ्या सापासारख्या दिसत होत्या.

पण भाऊराव अंगणातच येरझाऱ्या घालत होते. आम्ही आत यायच्या आधीच ते तानीमावशीवर खेकसले, "चांगला तमाशा करून ठेवलास गावभर ! शाळेत जाऊन मोठी शिवलीलामृत म्हणणारी ! जो तो थांबवून मला विचारत आहे. कुठं तोंड वर करायला जागा ठेवली नाहीस."

"तोंड वर करायला आधी तरी कुठे जागा होती ? आणि त्या वेळी काही तो माझा हातगुण नव्हता," मला आत ढकलत तानीमावशी म्हणाली.

"हे बघ, तुला एक सांगतो, त्या पोरासमोर माझ्याशी उद्धटपणा करू नको. माझ्या सहनशक्तीला देखील मर्यादा आहेत."

"आणि मी देखील काही शेणामातीची पांडवपंचमीची गौळण नाही. मला देखील मन आहे, हे कधीतरी कळलं का तुम्हाला ?"

"ते काही नाही. उद्यापासून त्याला शाळेत घेऊन जायचं बंद कर. पाहिजे तर तो येथल्या शाळेत जाईल, नाहीतर परत जाईल आपल्या मामाकडे. नसती ब्याद नको आम्हाला." भाऊरावांनी सांगितले, व ते खोलीत गेले.

तानीमावशी आत आली, तेव्हा तिचा चेहरा भडकला होता. तिने कुडचाभर तांदूळ काढले, आणि खिडकीपाशी झराझरा हात फिरवत ते निवडले. चुलीत खसपस केल्यावर दोन लालभडक निखारे निघाले. तिने त्यांच्यावर दोनचार तूरकाड्या टाकल्या. जाळाने जीभ दाखवली, व थोड्याच वेळात चुलीभोवती हातभार लांब लाल प्रकाश पसरला. ती चुलीपुढे बसली, पण ती पाणी केव्हा गरम करून माझ्या पायांवर ओतणार हे मला

समजेना. तिने त्या रात्री मला नुसता भात व लोणचे दिले. ती स्वतः काही न खाता आडवी झाली. मी तिला हलवून म्हटले, "तू काही खात नाही, होय ग ?"

"आज मला काही नको. तू झोप आता," ती म्हणाली. चुलीपुढे फार वेळ बसल्यामुळे तिचे अंग गरम लागत होते.

दुसऱ्या दिवशी भांडी घासायला तुळसा फार उशिरा आली. त्या वेळी आमचे जेवण झाले होते. तेव्हा भाऊराव लगवगीने आले, व तानीमावशीला म्हणाले, "आज त्याला शाळेत पोहोचवायचं नाही काय ? आटप लौकर. उशीर होईल त्याला-कालचं बोलणं राहू दे बाजूला. त्याचं कशाला उगाच नुकसान करायचं ?"

तानीमावशी काही बोलली नाही. तिने दप्तर माझ्या खांद्याला अडकवले, व ती माझ्याबरोबर निघाली. वाटेत ती एक शब्ददेखील बोलली नाही. टेकडी चढून आल्यावर ती थांबली व म्हणाली, "आता जातोस तू पुढं?" मी न बोलता मान हलवली. तेथून शाळा दूर असली तरी वाट सरळ होती. मी निघताच ती परतली, व टेकडीमागे नाहीशी झाली.

दोनचार दिवसांतच मास्तरांनी मला दुसरीच्या पोरांच्या पाट्या तपासायला सांगितले. त्यांनी एक गणित घातले होते. दोन पैशांना सहा आंबे, तर दोन आण्यांना किती ? मी पाट्या तपासू लागलो. तर काय, सगळीकडे भम् भोपळा ! अर्जुन आला व म्हणाला- "माझं गणित बरोबर दे, उद्या तुला मी मक्याचं कणीस आणून देतो." जोताने तर आताच खिशातून एक लांब पेन्सिल काढली. पण त्यांना बरोबर कसे देणार ? सगळ्या पोरांचे एकच उत्तर- अठ्ठेचाळीस आंबे. मी सगळ्या पाट्यांवर गुणिले गुणिले करून चूक लिहिले. मी म्हटले- "अरे सगळ्यांचीच उत्तरे अठ्ठेचाळीस कशी ?" तर अर्जुन म्हणाला- "कशी म्हणजे ? आम्ही सगळ्यांनीच उद्धवची पाटी बघितली. आम्ही नेहमीच त्याची पाटी बघतो." मी चूक म्हणताच उद्धव मात्र रागवला व म्हणाला- "मी आता तुझ्याशी बोलणार नाही." बाकीच्यांना काही वाटले नाही, पण ते देखील गप्पच बसले.

मग मास्तरांनी मला वाचायला सांगितले. जाधव मास्तर स्वतः फारच सावकाश बोलत, व मध्येच पानी, नाचन्याची भाकरी, साधू वानी असे उच्चार करत. त्यातही ते कधी जलद बोलू लागले की त्यांचे त-त प-प होऊन शि-शि-शिलंगण, को-को कोकणात, भ-भ भरपूर पाऊस असे होऊ लागे. खरे म्हणजे बहुतेक सगळी पोरे तसेच बोलत, पण मास्तरांनी चुकून व्हाना, विस्नू म्हटले की तोंड झाकून हसत. मधल्या सुट्टीत तर सगळी पोरे 'म्हा म्हाद्या, टा टाक की चें चेंडू-' म्हणत ओरडत, धिंगाणा घालत. मी पुस्तक उघडून वाचायला उभा राहिलो. मला उद्धव व इतर पोरांना हसवायचे होते, म्हणून मी वाचायला सुरुवात केली, "पान सात, धडा तिसरा, झाशीची रानी लक्षुंभाई फार शानी आणि सूर होती. प प परंतु-"

मी वाचायला सुरुवात करताच म्हटल्याप्रमाणे पोरे खदखदा हसली. मास्तर समोरच उभे होते. उंच गळ्याचे. बारीक उघड्या पायाचे. त्यांनी माझ्याकडे शांतपणे पाहिले, व शेजारच्या पोराला पुढे वाचायला सांगितले. मला वाटले, ते येणार व माझा कान चांगला पिरगाळून कानोल्यासारखा करून टाकणार. पण मास्तरांनी काहीच केले नाही, तेव्हा मात्र मुद्दाम शेणात पाय घातल्यासारखे मला वाटले, व मला मान वर करून पाहायला होईना. नंतर परवचा झाला, व एकदाची शाळा सुटली. आता मला येथून एकदा सुटायचे होते. पण सारे सांगितल्यावर तानीमावशी काय म्हणेल याची मला भीती होती. ती आली आहे की नाही हे न पाहता मी धूम ठोकणार होतो. मी लगवगीने दप्तर खांद्याला लावले, तेव्हा मास्तर आले, व माझ्या खांद्यावर हात ठेवून म्हणाले, "तू जरा थांब."

मला वाटले, आता आली कंबक्ती ! मला एकट्याला गाठून आता मास्तर मला फोडून काढणार ! पण त्यांच्याजवळ छडी दिसली नाही, हे एक बरेच होते. मी घावरत म्हटले, "मास्तर मला दूर दवाखान्यात जायचे आहे. मग रात्र होईल."

"घावरू नको. हवं तर मी तुला अगदी घरापर्यंत पोचवीन. नाहीतरी संध्याकाळी मी थोडे फिरून येतोच," ते म्हणाले, "मी तोंड धुतो, व मग जाऊ. तूही चल आता माझ्याबरोबर."

शाळेला लागून तसल्याच छपराची एक खोली होती. तेथे मास्तर राहत होते. त्यांनी हिरवे कुलूप काढले. आत जमिनीवर एक चटई होती, व कोपऱ्यात लहान वळकटी उभी केली होती. एका बाजूला चूल असून दोनचार भांडी

होती. भिंतीला लागून एक खोके होते व त्यावर अंथरलेल्या कापडावर शिसपेन कागद होते. आणि वरच्या फळीवर दहा-बारा पुस्तके होती. भिंतीवर एका म्हाताऱ्या खेडवळ बाईचा फोटो होता. मास्तरांनी पाणी बाहेर नेऊन पाय धुऊन घेतले, व नंतर आत येऊन खाकी विजार घातली. "असल्या धुळीत हिंडायचं तर खाकी विजार फार छान !" ते हसून म्हणाले. त्यांनी धोतराची घडी घातली, आणि दाराला कुलूप लावले.

"आज रात्री माझा उपवास असतो. तेव्हा स्वैपाक नाही, काही नाही, आराम !" ते म्हणाले.

आम्ही चालू लागलो. मास्तरांनी माझ्या खांद्यावर हात ठेवला. सहज म्हटले, "तुझे अक्षर छान आहे, तुला पुष्कळ कविता येतात. मी तुझ्याएवढा होतो त्या वेळी मी गुरे राखत होतो, आणि मला एक अक्षर लिहायला येत नव्हतं-"

ते आतड्याने बोलत होते. एकदा मला वाटले, त्यांनी मला एक मुस्कटात द्यावी, आणि चालता हो म्हणून माझ्यावर ओरडावे.

"तू राजेसाहेबांची विहीर बघितलीस ?" मास्तरांनी एकदम् विचारले. मी नुसतीच मान हलवली. "ती विहीर राजेसाहेबांच्या आठवणीसाठी राणीसाहेबांनी बांधली. राणीसाहेब अगदी गोऱ्यापान आहेत, हातभर दागिने घालतात, आणि त्यांचे वीस नोकर आहेत. बघ त्या तुला पाहिजेत तर त्या तुला घरी घेऊन जायला मिळतील. एवढंच की तुला तुझ्या मावशीला बदली द्यावं लागेल. हूं म्हटलास तर चल, आताच्या आता राणीसाहेबांची घोडागाडी तुझ्या दारात आणतो. मग काय म्हणतोस ?"

मला एकदम फार राग आला. मला वाटले, मास्तरांनी हवे तर मला झोडपावे, पण हे काय बोलणे झाले ? ती कुठली राणीसाहेब कुणास ठाऊक ! म्हणे हातभर दागिने घालते. दोन्ही पायभर दागिने घालेना का, तानीमावशीच्या हनुवटीवरील गोंदण्याची तिला सर यायची नाही. मी चिडून काही बोलण्यासाठी थांबलो, व मास्तरांकडे पाहिले. मास्तर हसत होते. तेव्हा माझ्या ध्यानात आले की मास्तर माझी थट्टा करत होते.

"मी कित्येकदा पानी, लोनी, कनसं म्हणतो म्हणून तू माझी चेष्टा केलीस. अरे, ती माझी भाषा आहे. लहानपणापासून अठ्ठावीस वर्षे मी ती बोललो, तिच्यावर वाढलो, ती झाली तरी एक भाषाच आहे. माझ्या खोलीत एका म्हातारीचा फोटो बघितलास नव्हे तू ? ती माझी आई. ती रस्ते झाडायची. एक चिमणी माझ्यापुढे आदळून ती मला रात्री उशिरा पुस्तकासमोर बसवायची, पण तिला आयुष्यभर कृष्ण म्हणायला काही आले नाही. ते तर माझे नाव आहे, पण शेवटपर्यंत मी तिचा किसनाच राहिलो. आता तिला देऊन टाकून दागिने घालणाऱ्या राणीसाहेबांना घेऊ होय रे पोरा ? ही भाषा बरोबर, की ती बरोबर याचा तू मोठा झाल्यावर विचार कर. आता ते जाऊ दे. पुस्तकात काय लिहिले आहे, तसं बोलायला, म्हणायला यायला पाहिजे. हे देखील खरंच आहे. म्हणून पुष्कळदा तसलं बोलणं घालवण्याचा प्रयत्न करतोच मी, करतो की नाही ? पण काही वेळा ते साधत नाही. आणि मी तोतरा आहे, हे काय मी मुद्दाम देवाजवळून मागून आलो होय ? आणि हे बघ; मी फार शहाणा आहे असं मी म्हणत नाही. इथल्या इथं माझ्यापेक्षा शहाणी खंडीभर माणसं आहेत. मला येतं तेवढं शीक. तेवढं झालं की दुसऱ्या जास्त शहाण्या माणसाकडे जा. अरे तू माझ्यापेक्षा जास्त शहाणा झालास, तर मला काय वाईट वाटेल होय ? हो की मोठा बारीस्टर, मग मी तुला पकडून आणून तुलाच अध्यक्ष करतो, मग तूच वाट आमच्या पोरांना बक्षिसं ! कुठलाही माणूस गांवढळ असला तरी त्याच्यात एक तरी गुण असतो. तू आगगाडीचं स्टेशन बघितलंस ?"

मी म्हटले, "होय. येताना मी आगगाडीनंच आलो अर्ध्यापर्यंत."

'ही, तर स्टेशनवर पन्नास ठिकाणची तिकिटं असतात. तुला जिथं जायचं आहे, तेवढं तिकीट घ्यावं माणसानं आणि जावं. आता माझंच बघ. मला सायकलवर बसायला येत नाही, गाणं म्हणता येत नाही, चित्रं काढता येत नाहीत. पण मला दोरीची पिशवी विणता येते, रंगीत कागदांच्या पट्ट्यांची चटई करता येते. मला गुलाबाची कलमं छान करता येतात. तसा मी पायीच खूप भटकलो आहे. अगदी रायगडला जाऊन एक नमस्कार टाकून आलो आहे. तुला यातलं काही आवडलं, तर शिकून घे. मी संपल्यावर दुसरीकडे जा. आणखी एक तुलाच म्हणून सांगतो. मी पुष्कळ लिहितो सुद्धा. कागद आपलं म्हणणं फार शांततेनं ऐकून घेतो. मी तोतरा आहे, मी पानी



अनुक्रमणिका

म्हणतो म्हणून तो मला हसत नाही...''

आता मात्र मला रडू आवरले नाही. जाधव मास्तरांच्या हातात छडी नव्हती, त्यांनी रागाने मला शिव्या दिल्या नव्हत्या. पण मला डोळ्यात पाणी आवरेना.

''तू तर वेडाच आहेस. रडायला काय झालं ? पोरपणी असं चुकतंच. पण ते चुकलं एवढं ओळख म्हणजे झालं. आता बघ, तुझं अक्षर छान आहे, तूदेखील का काही लिहीत नाहीस ? 'माझे आवडते झाड', यावर वीस ओळी लिही. अगर तुला आवडती माणसं असतील.''

''होय. आहेत की. अगदी पाच माणसं आहोत.'' मी डोळे पुसत म्हणालो.

''पाच '' एकदम थांबून मास्तर म्हणाले, ''पोरा, तू किती भाग्यवान आहेस याची तुला कल्पना नाही. मला एकच माणूस मिळालं होतं.''

''पाच म्हणजे सध्या दोनच आहेत. आई, नाना, सुम्मी आता नाहीत. पण तानीमावशी श्रीपूमामा आहेत.''

''मग असं कर, तू तुझ्या मावशीवरच लिही. मग मी तुला घरी गूळ, शेंगा, खारीक देईल, आणि स्वच्छ चांगलं लिहिलंस तर मी तुला एक बदाम देईन. मग आण लिहून आणि दे उद्या. उद्या नव्हे. उद्या रविवार, सोमवारी दे. आता बघ, टेकडीवरून जाशील पलीकडे एकटा ?''

मी हो म्हटले व थांबलो. देशपांडेनी मला छडी मारली तेव्हा तोंड घट्ट करून मी रडू आवरले होते. भिकारडा म्हटल्यावर मला राग आला होता. पण डोळ्यांत पाणी दाखवले तर त्यांचा विजय होईल म्हणून मी अगदी ताकाच्या खांबासारखा घुम्म राहिलो आणि आता कशाला काही नसता डोळ्यांतील पाणी थांबेना. मास्तर परत फिरले होते. मी टेकडी उतरून खाली आलो तेव्हा तानीमावशी येताना दिसली. ती सारखी धापा टाकत होती.

''मढं काढलं त्या कुत्र्याचं, सारखं अंगावर यायला लागलं !'' ती म्हणाली, ''एक तरवड फांदी घेऊन त्याला असं झोडपून आले, की ओरडत पंढरपूरपर्यंत पळालं असेल ! म्हणून उशीर झाला. आणि आज काय करून बसलास ? डोळ्यात गंगाजमुना दिसतात.''

मी तिचा हात पकडला, व मोठ्याने हसलो, ''हे तसलं काही नाही, निराळं आहे. ती एक माझी गंमत आहे.''

येताना मी तानीमावशीवर काय काय लिहावे हे आठवत होतो- मागचा भात स्वतःच कालवून खाताना तितकासा बरा लागायचा नाही, पण तोच भात तानीमावशीने कालवून त्यात लोणच्याचा खार घातला की सारा संपून आणखी भूक राहत असे; मला रामरक्षा येते, पण तिच्यासारखी नाही; एरंडाची नळी घालून केलेले तिचे साबणाचे फुगे माझ्यापेक्षा मोठे होतात; श्रीपूमामाला सांगून तिच्यासाठी वहाणा आणायला हव्यात, नाहीतर वाळूचे कण तिच्या टाचांत जातात. व मग ती सुई घेऊन रात्रभर टाच कोरत बसते; तिला एक खुरपेदेखील हवे, आता ती एक मोडकी पळी घेऊन सीताफळाच्या झाडाभोवती उकरते. व घागरभर पाणी ओतते; तिला निळे लुगडे छान दिसते, पण ते आता फार विटले आहे. मी मोठा झाल्यावर पैसे मिळवू लागल्यावर तसले नवे झगझगीत चमकणारे लुगडे तिला घेऊन देणार आहे; तिला कधीतरी पंढरपूरला जाऊन यायचे आहे. त्यासाठी देखील मी तिला पैसे पाठवीन. पण तिला अद्याप गलोलाने दगड मारता येत नाहीत, आणि शाईने लिहिताना तिच्या बोटांना फार शाई लागते.

तानीमावशीने मला एकदम ढोसताच मी भानावर आलो.

''कुठं लक्ष आहे रे मडक्या तुझं ?'' तिनं हसत विचारले, ''बघितलास नव्हं ?''

''काय बघितलास ?'' मी उत्सुकतेने विचारले. तर तिने माझ्या डोक्यावरच हात मारला, व त्यामुळे माझी टोपी खाली जाऊन घट्ट बसली.

''काय म्हणजे माकडाचं लग्न !'' ती म्हणाली, ''आता कसा मैलभर पिसारा असलेला मोर गेला समोरच्या बांधावरून. आणि बघितलास काय म्हणून विचारल्यावर तू उलट विचारतोस काय ?''

आता एवढ्या जवळून मोर गेला, आणि मला तो दिसला नाही म्हणताच मी चिडलो.

''मोर मलाच का दिसत नाही ?'' मी रागाने तिला विचारले.

''आता त्यावर डोकं आपटत बस,'' ती पुन्हा हसून म्हणाली, ''अरे, मोर कुणाला केव्हा दिसावा याबद्दल काही न्याय आहे होय ? दिसला तर तो दुसऱ्याला दाखवावा, नाही दिसला तर तक्रार करू नये.''





अनुक्रमणिका

परंतु मोर रतनला दिसतो, तानीमावशीला दिसतो, पण मला मात्र तो दिसत नाही याचा माझा राग कमी झाला नाही. मी मोर पाहिले आहेत असे सगळ्यांना सांगायला मला फार आवडले असते.

आम्ही घराजवळ आलो, तेव्हा तुळसा घरातून बाहेर पडली. ती असल्या वेळी कधी घरी यायची नाही, आणि भाऊरावदेखील या वेळी घरात नसत. तिला पाहूनच तानीमावशी दगडासारखी झाली. तुळसाकडे पाहत ती ओरडली, ''तुझं काम बाहेर आहे. माझ्या घरात पाऊल टाकशील तर पाय मोडून देईन.''

''हां, तोंड सांभाळून बोला बाय, भांडी घासणारी म्हणून वाटेवरची माती हाय काय मी ?'' हात नाचवत तुळसा म्हणाली, ''त्यांनीच आत येऊन चा घे म्हटलं म्हणून मी आत पाऊल टाकलं. नाहीतर माझं काय अडलंय पायताण ?''

''आणि उद्यापासून कामाला देखील येऊ नको. दुसऱ्या हज्जार मिळतील,'' तानीमावशी म्हणाली. रागाने तिचे ओठ थरथरत होते.

''घ्या की ठेवून तुमचं तुमाला काम ! गेल्या खेपेला बंद केलं तर नाक घासत घरी बोलायला आला की तुमचाच नौरा !'' एकदम वाईट हसून तुळसा म्हणाली. यावर भाऊराव खोलीबाहेर आले, व म्हणाले, ''तू जा आता. मी बघून घेतो, नाहीतर इथंच चव्हाटा होईल.''

तुळसा पुन्हा हसली, आणि होळी मिरवणुकीतील रंगीत हिजड्याप्रमाणे अंग वळवत निघून गेली.

तानीमावशी मला तेथेच थांबवून आत गेली व तुळसाने चहा प्यालेली कपबशी उचलून तिने दवाखान्याच्या भिंतीवर दणादणा फेकली. तिचे पांढरे तुकडे खाली वाळूत पडले. पण तिचा राग तेवढ्यावरच थांबला नाही. तिने भाऊरावांची कपबशीदेखील तशीच भिरकावून दिली. आता घरात कपबशीच उरली नाही. त्यानंतर ती भाऊरावांसमोर उभी राहिली, व शांतपणे म्हणाली, ''मी इतके दिवस सारं सहन केलं, पण आज मात्र अती झालं. आता या घरात मी तरी राहीन नाहीतर ती येसवा तरी !''

भाऊरावांनी बाहेर जायला कोट घातला होता. त्यांनी उगाचच मिशा साफ केल्यासारखे केले आणि ते पच्चदिशी म्हणाले, ''तू देखील त्या इरेला पडू नयेस. तू किंवा ती एवढंच ठरवायचं असेल, तर माझं काय उत्तर येईल हे तुला माहीत आहे. आत जा मुकाट्यानं.'' ते बोलले व लगेच बाहेर पडले.

रागाने ताणलेली तानीमावशी एकदम विझल्यासारखी झाली व कमरेवर ठेवलेले तिचे हात खाली पडले. ती सैलपणे आत आली आणि स्वैपाकघरातील भिंतीला टेकून बसली. मी दप्तर आत टाकले, कंदील लावून दिव्याला नमस्कार केला, व मग उगाचच तिला चिकटून बसलो.

''मला वाटलं होतं, मी जाते म्हणताच तरी ते वठणीवर येतील,'' ती पोकळ आवाजात म्हणाली, ''पण त्यांनी मलाच जा म्हणून सांगितलं की ! आता मात्र माझ्या आयुष्यांची निरीच सुटली.'' तानीमावशी बोलत होती, पण ते माझ्याशी नव्हते, कारण ती मोठ्या डोळ्यांनी समोरच्या कंदिलाकडे पाहत होती. त्या रात्री तिने स्वैपाक केला नाही. सकाळचीच भाकरी शिल्लक होती. तिच्याबरोबर थोडे ताक देऊन तिने मला जेवण दिले, आणि अद्याप उशीर झाला नव्हता, तरी मला तसेच रागावून झोपवले. नंतर तिने दिवा बारीक केला, पण ती तशीच बसून होती. मी मध्येच एकदा जागा झालो, तेव्हा देखील दिवा जळत होता, आणि तानीमावशीदेखील तशीच ताठ डोळ्यांनी बसून होती.

मग मी जागा झालो ते तानीमावशीच्या ओरडण्याने. ती बाहेरच्या खोलीसमाजेर उभी राहून ओरडत बोलत होती, ''मी ती कधीच देणार नाही. तिने वापरलेला कप देखील घरात नको होता, आणि अंगावरची माळ मी तिला देऊ ?''

''उगाच गावगन्ना करू नकोस,'' भाऊराव म्हणाले, पण त्यांचा आवाजदेखील मोठाच होता. ''ती पंढरपूरला जाणार आहे, तीनचार दिवसांकरिता मागितली आहे तिने. दे तेवढ्यासाठी.''

''माझी माळ घालूनच ये आलीस तर, असं सांगितलं आहे की काय सटवीला त्या विठोबानं ?'' तानीमावशी म्हणाली, ''मग तो पंढरपूरचा विठोबा नसेल, कुठल्यातली गल्लीतला उंडगा विठोबा असेल. आणि ती माळ काही तुमच्या घरातली नव्हे. तिकडून मला मिळालं म्हणजे हातात फक्त पोळपाट व केरसुणी. ती माळ मला लग्नात कमळीनं दिली आहे. मी जीव देईन, पण माझी

माळ देणार नाही. माझं मढं पाडा आधी, मग घ्या ती !''

तानीमावशी आत आली, तेव्हा मी जागा झालो हे तिच्या ध्यानात आले. ''आणि तू गप्प झोप रे. मध्ये मध्येच उठून बसू नको गोठ्यातल्या वासरासारखं,'' ती म्हणाली. तिने माझे पांघरूण उगाचच सारखे केले तेव्हा ती सारखी धापा टाकत होती.

भाऊराव तरातरा चालत दवाखान्याकडे गेले, व खडाखडा करत त्यांनी दवाखाना उघडला, व दिवा लावला. वाटल्यांचा आवाज झाला. मग थोड्या वेळाने पुन्हा तसाच आवाज करत दवाखाना बंद करून ते परत आले, व त्यांनी एक पुडी तानीमावशीपुढे फेकली.

''मरतो मरतो म्हणणारे असले मी पुष्कळ बघितले आहेत,'' ते म्हणाले, ''तुला मरायचं आहे ना, घे हे औषध, चार माणसांना पुरून उरेल बघ. असल्या धमक्यानं मी कंटाळून गेलो. आणि आता बऱ्या बोलाने ती माळ दे-''

तानीमावशी ताडकन् उठली खरी, पण भाऊरावांनी तिला भिंतीकडे ढकलले, व तिच्या गळ्यात हात घालून माळ हिसकावून घेतली. त्यावरोबर तिच्या गळ्यातील मंळसूत्राचा जुना दोरा देखील तुटला, व काळे मणी माझ्या अंथरुणापर्यंत पसरले. तानीमावशीला भिंतीवरच्या शिंक्याची तार ओरबडली. व कपाळावर रक्त दिसले, का कोणास ठाऊक, मला त्या वेळी फार संताप आला. मी अंगावरचे पांघरलेले जुनेरे फेकले, व भाऊरावांचा हात घेऊन मी त्याला कडकन् चावलो. ते दण्णदिशी फिरले, व पाऊल माझ्या अंगाला लावून त्यांनी मला अशा जोराने ढकलले की मी समोरच्या भिंतीवर जाऊन आदळलो, आणि डोक्यातील मुंग्या अंगभर झणझणल्या. मी वेंधळ्याप्रमाणे उभ्या असलेल्या तानीमावशीने चटकन कपडे वाळत घालण्याची काठी हातात घेतली. आता तिचा आवाज मोठा नव्हती की तो कापतही नव्हता. ती म्हणाली, ''ठीक आहे. शेवटी हे असंच व्हायचं होतं तर ! पण त्या पोराला जर पुन्हा हात लावशील तर, आईची शपथ घेऊन सांगते, की मी तुझ्या अंगाचा शेणकाला करून टाकीन.''

भाऊराव एकदम मागे सरकले. पण नंतर त्यांनी माळ एकदा हातात उडवली, व ते खोलीत निघून गेले. तानीमावशी माझ्याजवळ आली, व म्हणाली, ''तुला कुठं लागलं का ?''

माझे आदळलेले डोके अद्याप झणझणत होते. पण मी म्हणालो- नाही, तिने पुन्हा माझ्यावर पांघरूण घातले. मला वाटले, हे सारे घालायचे का तानीमावशीच्या वर्णनात ? मग मीच म्हटले- नको. कारण मग भाऊरावांचे नाव घालावे लागेल. आता मला भाऊरावांचे नावदेखील नको होते. भाऊराव हलकट होते.

मी असा झोपतो न झोपतो तोच तानीमावशीने मला हलवून उठवले, व म्हटले, ''उठ रे, चार वाजले बघ. नाथाच्या देवळात घंटा वाजायला लागल्या आहेत.''

''अग पण आज रविवार. शाळा नाही, काही नाही.'' मी डोळे चोळत म्हणालो. पण तिने मला हाताला धरून चक्क उठवून बसवले. स्वैंपाकघर चांगले ऊबदार होते, कारण तिने मोठा जाळ लावला होता, व त्यावर मोठे पातेले ठेवले होते.

''जा, बाहेर जाऊन ये, मग आंघोळ कर. आज मी तुला न्हायला घालणार आहे,'' ती म्हणाली.

आत जेवढे गरम होते, तेवढेच बाहेर थंड होते. मी कुडकुडत आत येऊन बसलो. तिने घसाघसा तेल लावून अंग हाडे अगदी सैल करून टाकली. सगळे गरम पाणी तिने माझ्यावर घातल्यावर मात्र अंग कापसाच्या बोंडासारखे झाले. मग आपल्या लाकडी फणीने तिने माझे केस विंचरले, व कपाळावर गंधाची टिकली लावली.

मी म्हटले, ''तानीमावशी, आज कसला सण आहे?''

सारे शांत होते तरी तिला माझे शब्द ऐकू गेले नाहीत. आतापर्यंत उजाडले होते. तेव्हा तिने दिवा काढला. तिने आज चहाबरोबर पोहे केले, पण त्यात खोबरे नसल्याने ते खडखडीत झाले होते. मी म्हटले, ''तानीमावशी, हे पोहे नकोत मला. दगडासारखे अहेत.''

''घरात बघ खोबरंच नाही आज,'' ती कळवळून म्हणाली.

आणखी थोडे उजाडले की मी लिहायला सुरू करणार होतो, तोपर्यंत मी कागद शिसपेन काढून ठेवली. तिला टोक काढायचे होते. दप्तरात कुठेतरी ब्लेड होते, पण मी नखानेच टवके काढून ती नीट केली. रात्री झोपेत तानीमावशीविषयी मला आणखी खूप आठवले होते. तिने तळलेले सांडगे कुरकुरीत जाईच्या फुलासारखे

स्वच्छ पांढरे होतात; काकणे घालून घेतल्यावर ती कासाराला नमस्कार करते; रात्री झोपताना ती हळूच 'आस्तिक आस्तिक काळभैरव' म्हणते; आणि संध्याकाळ झाल्यावर मीठ तेल विकत आणत नाही...

पण तोच तानीमावशीने मला हाक मारली. मी म्हटले, "आज अभ्यास, फार आहे. शिवाय मी एक गंमत लिहिणार आहे." पण त्यावर आज ती हसली नाही. उलट ती म्हणाली, "आज अभ्यास राहू दे. जरा इकडे ये."

तिने एका लहान गाठोड्यातून चांदीची वाटी, व सोन्याचे चारपाच लाखमणी काढले. वाटी मला देत ती म्हणाली, "ही वाटी बघून घे. ती पुन्हा तुला बघायला मिळायची नाही. काय लिहिलं आहे तिच्यावर ?"

मी ती बारीक अक्षरे वाचून पाहिली. तिच्यावर लिहिले होते- 'तानीस भेट-कमळी.'

"तुझ्या बारशाला आले होते, त्या दिवशी कमळीने मला ती भेट दिली होती," ती म्हणाली. तिने मणी व वाटी एक फडक्यात घातली. "मी आता बाहेर जाऊन येते. तोपर्यंत तू कुठे जाऊ नकोस."

ती बाहेर पडल्यावर मी लिहायला बसलो. तेव्हा मला एक ताव पुरला नाही. मला वाटले, मास्तर काय म्हणतील ? वीस ओळी लिही म्हणताच दोन ताव भरायला आले की ! पण मी तसाच लिहीत गेलो. तोपर्यंत शिसपेन मोडली. आता मात्र ब्लेडने तासल्याखेरीज टोक येणार नव्हते. मी दप्तर शोधले तर आत पुस्तकेच नाहीत. मला फार नवल वाटले. मग उठून मी बॅग बघितली. तर श्रीपूमामाने भरली होती, तशीच तानीमावशीने माझी पुस्तके, कपडे, पाटी आत ठेवून बॅग भरली होती. तळाशी रंगीत भोवरा तसाच होता. कारण तो बाहेर काढायचा मला प्रसंगच आला नाही. शाळा एकदाची संपली की माझ्याशी बोलत तानीमावशीने मला भोवऱ्याचा विसर पाडला होता. तानीमावशी फार उशिरा घरी आली. आल्याबरोबर मी तिला विचारले,

"हे काय, माझं सामान का भरलंस ?"

"कारण तू आज दुपारी दोन वाजता परत गावाला जाणार आहेस."

"म्हणजे श्रीपूमामाचं काय पत्र आलं होय ?"

"पत्रवित्र काही नाही. आत्ता सुट्टीही फार दूर नाही. आणि घरी गेल्यावर श्रीपू तुला समजावून सांगेल सगळं," ती म्हणाली. ही तानीमावशी निराळी होती. तिचा चेहरा आता विसकटल्यासारखा होता, व ती माझ्याकडे न बघता बोलत होती.

"अग पण मला अजून स्टेशन वगैरे काही माहीत नाही," मी म्हटले.

ती माझ्याजवळ आली, व बसली. आता माळ तर गळ्यात नव्हतीच, पण तुटलेले मंगळसूत्रदेखील तिने पुन्हा ओवले नव्हते. त्यामुळे तिचा गळा फार उघडा दिसत होता. "हे बघ, तू आता मोठा व्हायला शिकलं पाहिजेस. मी तुला किती दिवस पुरणार ! इकडे तिकडे विचार, शीक. सगळं आपोआप येत जातं मग. नंतर तर तुला सगळं एकट्यानंच सांभाळावं लागेल. त्या वेळी आपणाला माहीत नाही, म्हणून तू गप्प राहणार की काय! आज मी इब्राहिमला तुला गाडीत बसवून द्यायला सांगते. तो माझ्या थोड्या ओळखीचा आहे." तिने माझ्या तोंडावरून हात फिरवला आणि ती उठली.

तिने घाईघाईने भात शिजवला व त्यावर आज मुद्दाम मेतकूट टाकले. आज तिला काय लहर आली होती कुणास ठाऊक, पण मी एवढा मोठा, पण आज तिने मला घास घातले. ती मघाशी म्हणाली होती, तू आता मोठा व्हायला शिकले पाहिजे म्हणून ! आता तीच मला लहान करून घास भरवत होती. शाळेतल्या पोरांनी पाहिले असते तर फजितीच उडाली असती. पण मी म्हटले, इथे कोण आलंय बघायला ! आणि असली लहर तानीमावशीला पुन्हा कधी येणार कुणास ठाऊक ! ती स्वतः जेवली नाही, की तिने काही खाल्ले नाही. तिने पदरानेच माझी टोपी पुसली, व बॅग उचलून ती म्हणाली, "चल."

मला एकदम मी लिहिलेल्या कागदांची आठवण झाली. मी म्हणालो, "अग पळत जाऊन मी हे ताव तेवढे जाधव मास्तरांना देऊन येऊ का ?"

त्यावर तिने मान हलवली, "आता वेळ नाही रे. मोटर तिकडच्याच रस्त्याने जाते. तेथे मोटार थांबवायला सांगून बघू इब्राहिमला."

मी ते ताव चांगले घडी करून सदऱ्याच्याच खिशात ठेवले, तोच तानीमावशी पुन्हा म्हणाली, "चल, आटप लौकर." मी तिला तेथेच वाकून नमस्कार केला, व आम्ही बाहेर पडलो. या हातातून त्या हातात करत

तानीमावशीने मोटरस्टँडपर्यंत बॅग आणली. तेथे अद्याप मोटार आली नव्हती. रंगीत पाण्याने भरलेल्या सोडावॉटर बाटल्या टांगलेल्या एका हॉटेलात माणसे ये-जा करीत होती, व दुसऱ्या बाजूला निंबोण्या नी पिवळ्या झालेल्या जमिनीवर निंबाखाली चारपाच बाया-पुरुष अंग आखडून वाट पाहात बसले होते; तानीमावशीने बॅग खाली ठेवली, व ती मला चिकटून बसली. मग एकदम जोराने तिने मला कुरवाळले, व पदराने डोळे पुसून घेतले. तिचे डोळे लाल, ओलसर होते.

''हे बघ पोरा, तू आता जाणार. चांगलं मन लावून शीक, आणि मोठा हो. हां-मध्येच बोलू नकोस. तू शहाणा आहेत, तू शिकणार आणि मोटादेखील होणारच हे मला माहीत आहे. मागं मला खूप वाटायचं, घरात पोरं असावीत, त्यांच्या सतत आई आई म्हणण्याने आपण कौतुकानं हैराण होऊन जावं. पण एक झालं, ते दोन महिन्यांतच नाहीसं झालं. मग तुझ्यासारखा पोरगा कमळीनं पाठवला, आणि तू देखील आता परत चाललास शेवटी आपला शेरं असतो, तेवढंच आपल्याला मिळतं हेच खरं. काही करायला झालं नाही, काही नाही. तू इतक्या वर्षांनी येऊन चाललास, पण तुला एक नवा सदरा शिवून देण्क्षाची माझी ताकद राहिली नाही.'' तानीमावशीनने एकदम पदराखालून माझ्या दप्तराची पिशवी काढली, व बॅग उघडून तिच्यात घातली. ''तू जाताना काही गोडधोड विकत तरी घ्यावं म्हणून बघितलं, तर आजच धनाजींचं दुकान बंद. तो कसल्या तरी जत्रेला जाऊन बसलाय. म्हणून तू तसंच जाऊ नयेस म्हणून घरातलीच साखर यात ठेवली आहे बघ. श्रीपूला म्हणावं, काही करायला त्राणच उरला नाही.''

तिने मला घट्ट धरताच माझ्या खिशातील कागद चुरगाळले. तोच मोटर आली आणि समोरच उभी राहिली. तानीमावशीने तोंडावरून पदर फिरवला, व ती इब्राहिमकडे गेली. तो दातात बिडी धरून केस विंचरत उभा होता.

''हे बघा, या पोराला तेवढं बेळगावकडच्या गाडीत बसवून द्या. नवीन आहे, मेहेरबानगी होईल. नंतर तो आपल्या स्टेशनवर उतरेल आपणच.'' त्यावर इब्रामिहने बिडी हातात धरली व मान हलवली.

''अग त्याला शाळेजवळ मोटार थांबवायलाही सांग की हातासरशी,'' मी तिला डिवचून म्हटले, पण ते तिला समजलेच नाही. तिने बॅग आत ठेवली व मला आत ढकलले. मग तिने चोळीतून एक नोट काढून तिकीट काढले व मला दिले.

''सांभाळून ठेव. इब्राहिमकडे आगगाडीचे पैसे दिले आहेत. आणि हे घे दोन आणे तुला. वाटेत फारच भूक लागली तर काहीतरी विकत घे. पण दुसऱ्यांनी दिलेले काही खाऊ नको, वाटेत गाडीमधून उतरू नको,'' तानीमावशी म्हणाली. तिने दोन आण्याचे एक नाणे माझ्या सदऱ्याच्या खिशात टाकले, व पुन्हा एकदा माझ्या तोंडावरून हात फिरवला.

मग मात्र ती अगदी सैल होऊन खाली वाळू जळत असता तशीच उभी राहिली. त्या वेळी मला तिचा चेहरा अगदी रिकामा, आपण घर सोडून जाताना जुने घर दिसते त्याप्रमाणे टाकलेला दिसत होता. मला वाटले, तिने आता भाऊरावाजवळ राहू नये. तो हलकट आहे. तिने माझ्याबरोबर सरळ श्रीपूमामाकडेच यावे. ती तशीच काही न बोलता ओलसर डोळ्यांनी माझ्याकडे पाहत राहिली. मग मोटार सुरू झाली. मी हात हलवून येतो म्हटले, तेव्हा ती तशीच उन्हात गुडघे उंचावून खाली बसली, व डोके खाली घालून रडू लागली. मग मोटार निघाली.

लहान अरुंद रस्त्यावरून मोटार निघाली. वाटेत चिरचिरत डुकरे बाजूला होत. झिपऱ्या सोडलेल्या एका पोरीने मध्येच भाकरीचे गाठोडे आणून इब्राहिमला दिले. मोटार गावाबाहेरून शाळेच्या मागच्या बाजूला वळली. दूर अंतरावर शाळेजवळच मास्तर धुतलेले धोतर झटकत वाळत घालत होते. मी ओरडलो, मास्तर ! मास्तर ! मी इब्राहिमला देखील म्हटले, ''अहो, जरा येथे मोटर थांबवा-'' पण त्याला ते ऐकायलाच गेले नसावे. मी मास्तरांना पुन्हा हाक मारली, व खिशातून कागद धरून खिडकीबाहेर धरले. एवढ्या अंतरावर त्यांना हाक पोहोचली की नाही कुणास ठाऊक, पण ते मोटारीकडे पाहत थांबले. मी ताव तसेच खिडकीबाहेर टाकले, ते उडत शाळेच्या आवाराच्या कडेला तरी जाऊन पडले. मास्तर ते खात्रीने उचलून वाचतील. मग कधीतरी मुद्दाम टेकडी उतरून तानीमावशीकडे जातील, व सगळे सांगतील. मग तानीमावशी म्हणेल, वा, बराच लबाड





अनुक्रमणिका

होता की पोरगा ! पण ती आनंदाने हसेल, तिच्या हनुवटीवरील हिरवा गोंदलेला ठिपका आंगठीतल्या हिरव्या खड्याप्रमाणे चमकेल. मग मी हे सारे पाहायला येथे नसलो म्हणून काय झाले ? ती खात्रीने हसेल, आणि त्या वेळी, आत्ताच आपण झाडावरची ऊबदार कैरी झाल्याप्रमाणे मोहरातल्या लहान गोटीसारखी दिसणारी तिची हनुवटीवरील हिरवी खूणदेखील तानीमावशीबरोबरच अगदी सुरेख हसेल.

तोच कोणीतरी 'मोर ! मोर !' म्हटले, व दुसऱ्या बाजूच्या खिडक्यांकडे माणसांनी गर्दी केली. मी देखील उठलो, पण वाकून पाहत असलेल्या माणसांच्या गर्दीत मला खिडकीपर्यंत देखील पोहोचता आले नाही. मग लगेच ती माणसे पुन्हा आपापल्या जागी येऊन बसली.

"निदान आठदहा तरी असतील, नाही ?" कोणीतरी म्हटले, पण एक रुमालवाला माणूस मागे वळत म्हणाला, "आठदहा ? काय वेडं की काय तुम्ही ? अहो, पंचवीसच्या खाली एक कमी असले तर उजवा कान कापून देईन. डावा कान काय, कानफाट्या देखील कापून देईल! आमचंच शिवार नव्हं होय ते ? दररोज बघतो की आम्ही तो कळप !"

पंचवीस मोर आपला डोळे असलेला हिरवट पिवळा पिसारा, आणि निळी मान मिरवत समोरून झग्‌दिशी आले होते, आणि झग्‌दिशी निघून गेले होते. पण मला मात्र ते पाहायला मिळाले नाहीत.

स्टेशनसमोरच मोटार थांबली. मोटारीत मी खिडकीजवळ बसलो होतो व खिडक्यांना काचा नव्हत्या.त्यामुळे स्वच्छ सदऱ्यावर वीतभर राखी माती जमली होती. ती मी झाडत होतो, तोपर्यंत इब्राहिमने तिकीट आणले. त्याने माझ्याच डोक्यावर बॅग दिली व मला बकोटीला धरत आत नेले. मग ढकलतच त्याने मला समोरच्याच गच्च भरलेल्या डब्यात कोंबले. तेथे बसायला तर जागा नव्हतीच. मग मी बॅगेवरच एका कोपऱ्यात चेंगरून घेत बसलो.

"ए, तुझ्याजवळ पैसे आहेत ?" खिडकीतून इब्राहिमने विचारले.

मला आणखी पैसे कशाला पाहिजे होते ? तानीमावशीने दिलेले दोन आणे मला पुरे होते.

"आहेत, तानीमावशीने मला दोन आण दिले आहेत." मी म्हणालो.

"आण ते इकडे. मी काय कोरड्या गळ्याने जाऊ की काय ?" तो म्हणाला. मी त्याला माझे दोन आणे देताच तो स्टेशनवरच्या चहाच्या दुकानाकडे गेला. तेथे ताटात पिवळीधमक भजी होती. त्यांतील एक उचलून तो खात असता मला देखील एकदम भूक लागली. ती भजी मऊ, गरम, मसालेदार असावीत.

मला कोणीतरी हलवून उठवले, त्या वेळी वेडेवाकडे झोपून माझी मान अगदी अवघडून गेली होती. माझे स्टेशन आले होते. लोकरीची गरम टोपी घातलेल्या म्हाताऱ्याने मला हलवले नसते, तर मी तसाच गेलो असतो पुढे ! त्यानेच विचारले होते, म्हणून मी त्याला कोठे जाणार हे सांगितले होते, हे बरेच झाले होते. मी बॅग उचलली, व ती सरळ डोक्यावर घेऊन निघालो. आता रात्र बरीच झाली होती, व रस्त्यावर कुणी नव्हते. पण हा रस्ता पायाखालचा होता, गाव माझेच होते. मी श्रीपूमामाकडे आलो, त्या वेळी मला घाम आला होता, आणि डोक्यावरची बॅग जड दगडाची झाली होती. मी बॅग उतरून श्रीपूमामा म्हणून हाक मारली. पण एक नाही,









दोन नाही. पण नंतर बघतो तो काय ? दाराला कुलूप. आता एवढ्या रात्री जायचे कुठे ? माझे पाय तर कापसाचे होऊन बसले होते. मी कट्ट्यावर बॅग ठेवली, आणि आराम झोपलो. आता निदान पाय तरी अवघडत नव्हते, की कोणी पेंगत पेंगत येऊन आपल्यावर आदळत नव्हते.

श्रीपूमामा सकाळी फार उशिरा आला. मला पाहताच तो तोंड उघडे टाकून बघतच राहिला. कुलूप काढताना तो म्हणाला, "तू वावळटच आहेस. आजूबाजूला जरा चौकशी करायची. मी कोपऱ्यावरल्या किल्लेदारच्या दुकानात होतो. आज त्याचं दुकान बंद असतं, म्हणून आत आम्ही पत्ते खेळत होतो."

त्याने मला समोर बसवले, आणि विचारले, "का आलास तू ? पत्र नाही काही नाही. तानी अशी धाडायची नाही कारण असल्याखेरीज."

खरे म्हणजे मला आता फार भूक लागली होती. तानीमावशी मला या वेळी काही ना काही खायला देत असे. मी भूक लागली म्हणताच त्याने एका पातेल्यात असलेला थंडगार भात काढला, व त्यावर चमचाभर दूध टाकले. पण मला तो कोरडा घट्ट भात गिळेना.

"मी तुला नंतर रोट भाजी आणून देतो, पण आधी सगळं सांग," तो म्हणाला. मी त्याला सगळं सांगून टाकले. तुळसाविषयी, तानीमावशीची माळ घेतली त्याविषयी भाऊरावांनी तिच्यापुढे टाकलेल्या पुडीविषयी, मोराविषयी.

तो ताडकन उठला, व वेड्याप्रमाणे इकडे तिकडे हिंडू लागला. त्याने खिशातून पुष्कळशी चिल्लर काढली व माझ्या हातात घातली. तो घाईघाईने म्हणाला, "तूच जाऊन रोटभाजी आणून खा. मला बाहेर जायचं आहे. तू जर झोपणार असशील, तर आतून कडी लावू नको."

तो तसाच गेला. कोठे कशासाठी देव जाणे. मी दार नुसते ओढून घेऊन भटांच्या हॉटेलमधून दोन पैशाची भाजी व एक मोठा रोट आणला. तेवढा संपल्यावर कुठे पोट शांत झाले. मग मी जाजम पसरले, श्रीपूमामाची टेकायची उशी घेतली, आणि आखडून गेलेले अंग पसरून दिले.

मी जागा झालो त्या वेळी श्रीपूमामाने दिवा लावला होता, व तो मशिनीजवळ भिंतीलाच टेकून बसला होता. त्याची उशी मी घेतली होती.

"आणखी काही तिनं सांगितले नाही ?" जणू तो इतका वेळ बाहेर न जाता इथेच असल्याप्रमाणे विचारले.

"काही सुद्धा नाही. मी केव्हा परतायचे हे देखील सांगितलं नाही. येताना पुडाभर साखर मात्र दिली तिनं. आता वक्कळ महिनाभर चहा पाहायला नको," मी सांगितले.

श्रीपूमामा स्वतःशीच घुम्म बसला होता. थोड्या वेळाने तो म्हणाला, "पंचेचाळीस वर्षे मी गुरासारखा रावलो, आणि तेवढ्यात काय केलं ? तर निवळ पोटाचा खळगा भरत आलो बघ. अरे, अचानक पाहिजे झाले तर आज मला पंधरीवीस रुपयांची ऐपत नाही. आज वीस ठिकाणी मी भटकलो, दातांच्या कण्या केल्या, तेव्हा कुठे सतरा रुपये जमले. एकानं तर मोठ्या जिकिरीनं आठ आणे दिले. हे मशीन, माझ्या पोटाची गिरणी, पण त्याचं कर्ज दहा वर्षांत फिटेना. मग कमळी तानीला हात उचलून काही द्यायचं तर दूरच हे बघ मी उद्या दुपारच्या गाडीनं तानीकडे जातो, आणि तिला पुढे घालूनच घेऊन येतो. त्या आधी गाडीच नाही. तू या डब्यात पैसे आहेत ते घेऊन सकाळी आऊवाईकडे जेवायला जात जा. रात्री रोटभाजी घे आणि दार उघडं टाकून भटकू नकोस उंडग्याप्रमाणे. शिवाय.."

मला झोप आवरेना. व तो काय सांगतो हे कानावर पडत असतानाच मी पेंगू लागलो.

दोन वाजण्यापूर्वी गाडीच नव्हती. पण अकरा वाजल्यापासून श्रीपूमामा सारखा येरझाऱ्या घालत होता, सारखा समोरच्या घरातील घड्याळाकडे पाहत होता. मग एक वाजताच तो बाहेर पडला, व झपाझपा चालू लागला. तो कोपरा वळून गेला असेल नसेल तोच पोस्टमन आला. आणि त्याने एक पाकीट खोलीत टाकले. मी टोपी घालून धावत गेलो. श्रीपूमामा तोपर्यंत वीणापाणीच्या देवळापर्यंत गेला होता. मी धापा टाकत पत्र त्याला दिले. पत्र म्हणताच तो घाबरला, आणि मटकन् देवळाच्य कट्ट्यावर बसला. त्याने मोठ्या, कोरड्या डोळ्यांनी पत्र वाचले, व तो ताड्ताड् परत आला. मी आत येताच तो घोगऱ्या आवाजात म्हणाला, "तानीमावशी गेली. झोपली ती उठलीच नाही."

त्याने रागाने पाण्याचे भांडे लाथाडले, व त्यामुळे खोलीभर पाणी आले. त्याने चिंध्यांचा ढिगारा उधळला.

व काही चिंध्या रंगीबेरंगी पिसाप्रमाणे माझ्या अंगावर येऊन पडल्या. मशिनीला तेल घालायचे नळकांडे खिडकीत होते, ते देखील त्याने खाडकन भिंतीवर आदळताच त्यातील तेल डचमळले, आणि भिंतीवर तेलाचा डाग पडला.

"मूर्ख, बेअकली, अक्कलशून्य !" तो ओरडत म्हणाला, "मी काय मेलो होतो, की काय माझे हात झिजले होते ? हात झिजवायला मला फारशी माणसं नाहीत, हेच उलट माझं फुटकं नशीब. कशाला राहायचं होतं त्या घाणीत ? मला एक माणूस काही जड नव्हतं. लाथ मारायची त्या घरावर, त्या माणसावर आणि यायची होतीस तू सरळ या ठिकाणी !"

मला पहिल्यांदा वाटले, श्रीपूमामा मलाच शिव्या देत आहे. पण नंतर माझ्या ध्यानात आले की तो तानीमावशीला कावत आहे. ती गेली, आणि ती गेल्यावर तो तिच्यावर असे रागावत आहे, याचे मला फार वाईट वाटले. पण तो असा पेटला होता, की एक शब्द बोलायचे मला धैर्य नव्हते.

त्याने पत्र टराटरा फाडून टाकले, व तो पुन्हा खोलीभर फिरू लागला, "मी काय सांगतो हे चांगलं ध्यानात ठेव. भिंतीवर अगदी तीन बोटे लावून ठेव चुन्याची ! कधीतरी जाऊन त्या राक्षसाला एकदा तरी झोडपून आलो नाही, तर माझं नाव श्रीपाद त्र्यंबक जोशी नव्हे. माझे बाप दोन!"

त्यावर तो एकदम माझ्याजवळ आला, व हिसक्याने त्याने मला उठवले, "जा,तू बाहेर खेळ जा मारुतीच्या देवळात !" तो खोलीच्या मध्ये पाय पसरून उभा राहिला, आणि पैलवानाप्रमाणे उडी मारून त्याने शड्डू मारला. तो म्हणाला, "तू घाबरू नकोस. मी आहे की ! तू आणि मी मिळून अजूनही त्या भडव्या नशिबाला टांग मारू. जा, तू थोडा वेळ देवळात खेळून ये."

त्याने मला जवळ जवळ ढकलतच बाहेर घातले, व धाडदिशी दार लावून कडी लावून घेतली. मी देवळाकडे निघालो. मला वाटले, नरसू, राजाराम तेथे असतील, त्यांच्याशी बोलायला मिळेल. मी तानीमावशीबरोबर हरेश्वराला गेलो नाही, पण तेथे खरेच गेलो होतो असे सांगून मी तळ्यातील कमळे, मोर आणि कैऱ्या यांचे वर्णन करणार होतो. तसे माझ्या ध्यानात आले आपण येताना टोपी घातली नाही. आणि टोपी घातल्याखेरीज देवळात कसे जायचे ? मी परत आलो. श्रीपूमामाला पुन्हा दार उघडायला सांगायच्या ऐवजी खिडकीतूनच त्यांच्याकडून टोपी घ्यावी म्हणून मी खिडकीपाशी आलो. पण मला श्रीपूमामाला हाक मारायचे मन झाले नाही. कारण चिंध्यांच्या ढिगावर तोंड टाकून श्रीपूमामा लहान मुलाप्रमाणे एकटाच रडत होता.

मी देवळात गेलो नाही. बाहेरच एका बाजूला उंबराचा पार होता. तेथली फरशी दुपारी उन्हात फार तापत असे, पण संध्याकाळी मात्र ती निवत नुसती ऊबदार होत असे. अशा वेळी जाऊन तिच्यावर बसायला मला फार बरे वाटत असे. शिवाय त्या वेळी वर शांत वारा लागे. मी तेथें जाऊन बसलो, त्या वेळी तेथे आणखी कुणी नव्हते.

तेथे आणखी कुणी नव्हते हे खरे नव्हे. भोवती सगळीकडे तानीमावशी होती- मला ढकलून ढकलून हसणारी; मास्तरांना चोख रामरक्षा म्हणून दाखवणारी; दमून धापा टाकत शाळेकडे येणारी; कपबश्या कडाकडा फोडणारी; आईची शपथ घेऊन हातातील काठीने हाडे मोडायला शांतपणे उभी असणारी तानीमावशी; आणि मोटार सुटल्यावर भर उन्हातच गुडघ्यात मान घालून एकटीच बसलेली तानीमावशी !

आणि आता बरेच राहून गेले. मला हरेश्वरला जायला मिळालेच नाही. पालथे पडून मी तेथल्या झऱ्याचे पाणी ओंजळीने प्यालो नाही. मी तिच्यावर लिहिलेल्या वर्णनाची गंमत तिला कळलीच नाही. निळ्या माना हलवत क्षणात नाहीशा होणाऱ्या डौलदार, रानमोकळ्या मोरांचे चित्र तर माझ्या डोळ्यांवर कधी उमटलेच नाही.

झाडावरूनच ऊबदार, गुळगुळीत कैरी काढावी. ती मुठीनेच फोडून तिच्यावर मीठ तिखट- हां, लाल तिखट, हिरवे नव्हे-घालून ती खावी. ते तर अगदीच राहून गेले. आता हे मात्र कधी होणारही नाही.

कारण तानीमावशी गेली, व जाताना माझी मीठ तिखटाची कैरीच ती आपल्याबरोबर घेऊन गेली.

❖❖❖

**जी. ए. कुळकर्णी**

'पिंगळावेळ', पॉप्युलर प्रकाशन, १९७७,
पृ. ५२-८५
(पॉप्युलर प्रकाशन, मुंबई यांचे सौजन्याने)



अनुक्रमणिका

# इंजेन

आनंद यादव

समदीजणं घटकाघटकाभर सावलीला पडलेली. मांडवात बैलं भुकंच्या तावाला उसाचा गारेगार पाला गपागप खातेली. मोटंवर बैलांबरूबर तंगलेल्या सित्याला नुक्ताच कुठं डोळा लागला; तवर मालक घाम्याघूम होऊन मळ्याकडं आला... खोपीचाया आडासनं मांडवाकडं एकदम् कुणीतरी आलेलं बघून वैरण खातेला सोन्या दचकला. मालक खोपीत गेला नि त्येनं सित्याला हाळी घाटली.

"सित्या, उठलास काय ?"

निजून कितीबी वकत झालाय कुणाला दखल; म्हणून गडद नीज लागलेला सित्या हडबडून उठला.

"काय हो मालक ?"

"ऊठ. गाडी जूप."

"एवढ्या उनाचं ?"

"आरं, कुठलं ऊन ? सोन्यासारखं इंजेन येऊन पडलंय कागलात... लोखंडाचा जित्रस; उनाचं तापूनबिपून फुटायचं एखाद्या वक्ताला."

मोटा सोडून नुसतं घटकाभर झालं हुतं. बैलांच्या तोंडांचा अजून फेसबी वाळला नव्हता. वैरण खायला माना खाली करताना भगभगणाऱ्या वसिंडांचं कढ कमीकमी हुईत चाललेलं. ठणकतेल्या चारीबी पायांच्या शिरा तट्ट फुगल्या हुत्या. हे समदं हिरव्या वैरणीपायी सोसायचं... आणि आता डोळ्यांफुडं नुसती हिरवीगार वैरण दिसत हुती. वर चैताचं ऊन रणझणतेलं.

सित्यानं बैलांकडनी वाकूण बघिटलं.

"फुड्यात टाकलेल्या पेंड्या तरी खाऊ देत वैलं."

"ऱ्हाऊ दे चल. आल्यावर खातील म्हणं."

चूळ भरून गावाकडं जायाची कापडं घाटली नि बैलांस्नी कासरा लावला ...अर्धा-निम्मा घास खाईतखाईतच बैलं मांडवातनं बाहीर आली... त्यांस्नी वाटलं, पाणी पाजायलाच पाटाकडं एवढ्या लवकर न्हेत्यात. तेवढ्यातनंबी रुप्या बैलानं दांडगाच्या दांडगा घास करून घेटला.

दांडीच्या घोड्याला धरून सित्यानं गाडी वर उचलली नि वैलांनी मुकाटपणानं जुवाच्या खाली माना सारल्या... घास तोंडात चाललंच हुतं.

सोन्याची सापती लावायला सित्या त्येच्याकडं वळला. वादी ववायला जुवाला हात लावल्यावरनंवर त्येच्या हाताला चाऽट्दिशी चटका बसला... बैलं जू मानंवर घेऊन गप्पच हुबी हुती. सित्यानं सरळ पुन्ना घोडा वर उचलून वैलांच्या माना बाजूला सारल्या नि घोडा भुईवर टेकवला.

"का रं आणि ?"

"जू इस्त्याच्या खेंडागत तापलंय. वैलांच्या माना होरपाळून जातील चार्ररदिशी."

"तुझा मर्दा, लई रमणा."

"झालं की. जरा पाणी मारून घेतो जुवावर."

"आटीप आटीप लवकर."

कसंबसं पाणी वतलं नि गाडी जुपली. कागलाच्या वाटंनं बैलं पाय उचलू लागली... उनाची उसळलेली कायील त्येंच्या उघड्या अंगावर वतत हुती.

पाचसा एकराचं एवढंएवढंसं रान. त्यात सरकारी मदतीनं हीर काढलेली. एक मोट चालायपुरतं हिरीला पाणी. ते वडायला सोन्यारुप्याची जोडी. इंदराच्या ऐरावतागत पांढरीधोट. चारपाच, चारपाच गाडी गूळ मळायचा. नांगर, कुळवट, पेरणी, खतपाणी; समदं दोनच वैलांवर... मालक सालासालाला गबर व्हायचा. लक्षुमी कायम भरल्या वटीनं घरात पाय टाकायची. मालकानं बंदराच्या सणाला देव पुजल्यागत पुजल्यावर बैलांस्नीबी बरं वाटायचं... त्येंच्याच पायांच्या पुण्याइनं आज इंजेन घरात येत हुतं.

गाडी कागलाकडं जाईल तसं मालकाच्या मनात इंजेन सुरू झालं... फुडच्या वर्सांचा दराक्षाचा मळा गारेगार झुलला. मायंदाळ लावलेला ऊस पाणी पितेला दिसला... एका-एका रुपायातनं धा-धा रुपयाची पिल्ली बाहीर पडली.

"सित्या, येत्या मिरगाला पैशांचाच पाऊस पडतोय् बघ शेतावर."

"ते कसं काय ?"

"आरं, इंजेन आता पाण्यावर बसलं म्हंजे समदाच्या

समदा मळा हिरवा हुनार की.''

''मोटंनंबी हुतोयच की आता.''

''तसं न्हाई. हिरीला इंजेन लागलं की उपसा दुपटीनं हुनार. सकाळी सुरू केलं की तासरातीलाच बंद. मधी दमच खायचा न्हाई.''

''हां.''

''बेलांचं तसं कुठं असतंय ? मधी दोनअडीच तास वैरण खायाला सोडावी लागत्यात्.''

''व्हय की.''

''शिवाय मोटंवर एक पेशेल गडी. इंजनाचं तसं न्हाई. सुरू केलं की खुशाल गप बसावं; न्हाई तर बाकीची कामं बघावीत.''

''म्हंजे एक गडी इंजनानं वाचलाच म्हणायचा की.''

''तर. शिवाय पाण्याला इंजनाचा उपसा असला म्हंजे पाणी हिरीत कायम साठत जातंय... आसपासच्या हिरींचं पाणी आपल्याकडं खेचलं जाणार हो. कसं ?''

''तेवी बरूबरच हाय म्हणा.'' सित्या हूंला हुं म्हणत हुता.

गाडी कागलातल्या माने-मेस्तरीच्या दुकानाला येऊन थडकली... एक दांडगीच्या दांडगी पेटी दुकानासमोर पडली हुती. तिच्यावर काळंकाळं दोन छाप... त्यांस्नी सोन्या बैल चाटकन् भुजला नि गाडी लाऽक्ककरून हलली. सित्यानं कासरा तंग केला... वेतानं कासरा वडून तिची पाठीमागची बाजू पेटीजवळ न्हेली. पाठीमागं काय पाहिजे ते होऊ दे म्हणून बैलं फुडं बघून गप हुबी न्हायली.

मेलेल्या जनावराला उचलावं तशा सांग्या लावल्या नि धा-बारा जणांनी मढं उचलल्यागत इंजेन उचललं. तसंच गाडीत सारलं. मोक्यांसंगट मागंफुडं पेटी गच्च बांधली. इंजेन बरूवर गाडीच्या बुटावर न्हाईल असं केलं.

उचलायला आलेल्या माणसांस्नी मालकानं च्या दिला, पान दिलं नि गाडीकडं आला... जुवासंगट बांधलेली बैलं त्येच्याकडं गरीब डोळ्यांनी बघत हुती. आणि छापाचं मोठंमोठं डोळं बैलांकडनी लावून चौकोनी पेटी गाडीत ताठून बसली हुती.

मालकानं आणि सित्यानं मिळून जू खच्चाटून उचललं नि बैलांनी त्येच्याखाली आपल्या माना घाटल्या. सित्या गाडीचं घुणं काढाय गेला; तवर मालकानं सापत्या बैलांच्या गळ्यांस्नी आवळल्या... गाडी गावाकडच्या मळ्याकडं चालली.

माळरानाची वाट. वाटंला खाचखळगं, दगडान्नं गुंड, चाकोरीच्या व्हंगाळी पडलेल्या. तसल्यात इंजनाचं वझं मरूस्तवर. चाक दगडावरनं खाली पडलं की गाडी बैलांच्या मानत दाण्णदिशी आदळायची. खळग्यातनं वरखाली हुतानं तर वसिंडाला घसाघस हिसकं बसायचं. खडकातनं मानत बुक्क्या मारल्यागत हुईत हुतं... गाडी मळ्याकडं चालली हुती. मालक पेटीला टेकून पान खाईत, तोंड रंगवत हुता. सित्याच्या हातात बैलांचा कासरा... वर उनाची चुलीवर ठेवलेली कायील.

मळा आला. बैलांच्या डोळ्यांस्नी वळखीची पिकं दिसली. सकाळचं पाणी पिऊन ऊस डुलत हुता. वाऱ्यासंगं मका खुसखुसतेला आणि कोबीचं गड्डं मोठ्यामोठ्या हिरव्याभोर पानांनी बैलांकडं बघून हासतेलं... हिरीच्या पलिकडची खोप वळचण डोळ्यांवर धरून गाडीतल्या पेटीकडं बारीकबारीऽक बघत हुती.

बांध आला तशी बैलं लगालगा पाय उचलू लागली. तिथली वाट-नि-वाट पायांखालची. नांगरटीतनं, खड्ड्यातनं घसाघस वडत नि तोंडं फेसाळून घेत बैलं सरळ हिरीजवळ आली.

वैरण खाऊन, पाणी पिऊन त्येंनी दुपारी मोटा वडल्या.

बेस्तरवारी नारोळ फोडून इंजेन बसवायला हिरीजवळ खड्डा काढला. आदल्या दिशीच इंजनाची पेटी सोडवून घेटली हुती... आज सकाळधरनं किशा डायव्हर नि त्येचा एक दोस्त येऊन ने जोडत हुता. बैलांच्या मांडवाच्या सावलीला हे काम चाललं हुतं. जरा परभारी असलेल्या बांधावरच्या बाभळीच्या सावलीत बैलं बांधली हुती. मोटंचं पाणी प्यालेल्या बाभळीनं त्येंच्यावर शिऱ्यांचा पदूर पसरला हुता... भवतीनं मातूर ऊन येढून बसलं हुतं... त्येच्या झळा अंगावरनं आगीचं वारं गेल्यागत झळझळतेल्या.

सित्या किशाच्या हातांबुडी हे उचल ते उचल करत हुता. गावात जाऊन कायतरी आणायचा. पुन्ना जायाचा. मालकाची पोरं इंजनाच्या भवतीनं, खड्ड्याच्या भवतीनं सारखी घिरट्या घालत हुती... आजच्या आज इंजेन बसवायचं हुतं.

जेवणं करून माणसं पुन्ना कामाला लागली. ऊन बोलू

देईना झालं. पोरांनी उसावरच्या सारावरचं आजपतोर फुललेलं झेंडू तोडलं.. त्येंच्या माळा केल्या नि खड्ड्यात ठेवलेल्या इंजनाच्या डोसक्याला घाटल्या. सित्या कपाळाचा घाम पूऽऽपुसून डायव्हर सांगेल तसं इंजनाच्या बुडातली माती ऐदानानं सवणत हुता. शेजारीच एका दगडावर दुसरा दगूड चिकटून ठेवल्यागत मालक बसला हुता... बाभळीबुडली बैलं त्येच्याकडं तारताळ्या देत बघत हुवी हुती. सकाळधरनं त्यांस्नी कुणी वैरणच घाटली न्हाई. इंजेन बसवायच्या नादात उसाचा पालाबी आज कुणी काढला न्हवता... सित्या सवणता सवणता आठवण होऊन मालकाला म्हणाला,

"मालक, बैलांस्नी दोन पेंड्या उसाचा पाला तरी काढून घालतो."

"न्हाऊ दे तिकडं. एक दिसानं बैलं काय मरत न्हाईत. इंजेन एवढं सवणून झालं पाहिजे. आजच्या आज सुरू करून बघायचं- ह्येंद्याऽ" दगडावर तसंच बसून मालकानं पोराला हाक मारली.

"काऽय ?" पोरानं शेंबूड वडला.

"बैलांस्नी गवताच्या दोन पेंड्या टाकून ये जा रे."

ह्येंद्यानं मोजून दोनच पेंड्या व्हळीच्या काढल्या नि बैलांसी टाकून आला. किती टाकून आला, बैलांच्या फुड्यात त्या पडल्या का न्हाई, ह्येच्याकडं कुणाचं ध्यानच न्हवतं... मालक इंजनावर डोळं धरून बसला हुता नि डायव्हर भवतीनं फिरत, कामं सांगत डायव्हरकी करत हुता.

"सित्या, चांगलं सवण हं. न्हाईतर सुरू झाल्यावर हादरत हादरत फुडं जाऊन हिरीत घसरायचं." मालक.

सित्या हूंऽ म्हणून ऐदान उचलत हुता नि सवणत हुता. मालकाजवळचं पान खाईत डायव्हर म्हणाला, "मालक, इंजनाला सावली कायतरी केली पाहिजे."

"करा की. हयगय नगं. आजच्या आज करून टाका."

"आजच्या आज कसं जमणार ?" सित्याचा कान मालकाकडं हुता. ऐदान उचलून उचलून त्येची आतडी वर आली हुती.

"जमंल की."

"चारपाच तरी मेडकी तोडाय नगंत ? एकदोन येळकटं, शेवऱ्या, व्हय-न्हवं; समदं गोळा कराय पाहिजे."

"मग ?"

"उद्या सामान जमवून परवाच्याला घालावा." दमलेला सित्या.

"उद्या-परवावर नि कशाला ?"

"न्हाईतर ह्योच मांडव मोडून घालावा." वेलांच्या मांडवाखालचा डोकेबाज डायव्हर म्हणाला.

"छे ! छे ! वेलांची सावली हाय ती." सित्या.

"वेलं बांधायला येतील म्हणं बाभळीबुडी चार दीस. तवर ह्योच मांडव मोडून इंजनावर घाला."

मालकाला घाई हुती. सित्याला मालकी न्हवती... त्यो नि बैलं एकाच दावणीतली.

इंजनावर वेलांचा मांडव मोडून घाटला. वैरणीच्या व्हळीतल्या सातआठ पेंड्या कडवा काढून वर हातरला... खुट्टं, दावण उघडी पडली... बैलं बाभळीबुडीच अनवाणी रवथ करत बसली. मोडून नव्यानं घाटलेल्या मांडवात इंजेन काळाघूस नटलेला न्हवरा बसल्यागत दिसत हुतं... जलमभर त्येच्यासंगं नांदायची पाळी हिरीला येणार हुती... दुसऱ्या बाजूची मोटवाण इंजनाकडं पुन्नापुन्ना मान वाकवून निरखून बघत हुती. पोरं शिट्ट्या मारत इंजनाच्या भवतीनं नाचत हुती.

नळा दुसऱ्या बाजूनं पाटात सोडला. इंजेन सुरू झालं नि तेलाचा वास मारतेलं काळंकाळं पाणी नळ्यातनं बाहीर उसाळलं... पाट एकदम येडवडून गेला... पाणी हिकडनं कुठनं आलं ? मोटवाणीचं तर कंवारडंच मोडल्यागत झालं. आपली जीवच कुणीतरी काढून घेतल्यागत तिला वाटलं. पाटाची दगडं म्हाताऱ्या माणसाच्या मनानं येईल ते पाणी फुडं सोडत हुती.

उन्हाळ्याचा पावसुळा झाला. एका एकरात दराक्षाचा मळा हिरवा होऊ लागला. इंजेन पाणी वडू लागलं नि बैलांची वाट बघून बघून धाव तशीच पाटाकडंला जीव नकोसा होऊन भुकेवलेल्या माणसागत पडून न्हायली. वरची आंब्या-बाभळीची वाळली पानं तिच्या अंगावर उवा-लिक्षा झाल्यागत बुचबुचली. ना पाणी ना येवस्था. गुडघाभर केराचं टेपाण अंगावर साठलं... मोटंचा चाक-कणाबी बिनघुमताच तोंड शिवल्यागत गुमान न्हायला. सित्याच्या हातातनं मोटंचा नाडा गेला नि गळ्यातलं गाणंबी गेलं. सत्ता नसल्यागत बैलं टंपरवारी वरवरची कामं करू लागली. नांगरट-कुळवट करणं, खतमूत वडणं





अनुक्रमणिका

असली सोभाग नसलेली कामं.

साल उलटलं नि पुन्रा उन्हाळा चटकं देऊ लागला... पाण्याला वड बसली. पिकं जागच्या जाग्याला उपडून ठेवल्यागत झाली... इंजनाचं पाणी म्हणून बराच मळा हिरवा करायचा बेत केला हुता; त्यो असा कोळमसून चालला.

न्याहारीच्या वक्ताला मालक मळ्याकडं आला तरी इंजेन बंद हुतं.

"इंजेन का सुरू केलं न्हाईस रं सित्या ?"

"तेल सपलंय."

"परवादिशी आणलं हुतं की."

"काल सांजच्यालाच झालं... इंजेन तेल लई खायाय लागलंय."

"ते बरूबर हाय. पर तेल बिल्याक-मार्किटनं आणाय लागतंय त्येचं काय ?... दुप्पट पैसा जातोय."

"मग आता पाणी तरी पाजलं पाहिजे रानाला. उन्हाळ्याचं दीस."

डोसक्यात किडं पडल्यागत झालं नि मालक तसाच घराकडं गेला... आयला ! एवढा पैसा आणू तरी कुठला? गेल्या सालापासनं सात हजार गेलं. अजून हातात कशाचाबी पत्त्या न्हाई. खर्चा दुपटीनं वाढाय लागलाय. घरात तर दातावर माराया पैसा न्हाई.

आठ दिसांनी मालकाला एक बातमी कळली. इचारी होऊन मालक सित्याकडं आला.

"सित्या, तेलाची दांडगी दोन ब्यारेलं मिळणार हाईत."

"ब्येस झालं. कवा मिळणार हाईत ?"

"उद्याच्या उद्या मिळतील; पर हातात पैसं पाहिजेत."

"आता मग ते हो मी काय सांगणार ?"

"माझ्या मनात एक इचार हाय."

"कोणचा ?"

"निम्मी वैरण इकावी म्हणतो. गिऱ्हाकबी आलंय."

"आणि बैलांस्नी ?"

"बैलांस्नी निम्मी ठेवायची. त्यांस्नी आता जादा वैरण काय करायची ? वरची तर कामं करत्यात."

सित्या बैलागत गप्पच बसला. बैलं सावलीबुडी भवतीच्या उनाकडं बघत बसली हुती.

व्हळीची निम्मी वैरण गेली नि मुंडकं तुटून गेलेल्या जनावरांच्या मुडद्यागत दिसणारी तेलाची दोन ब्यारेलं बैलांनी रातचं जाऊन ठेचा खाईत खाईत वडून आणली.

दुसऱ्या म्हयन्यात व्हळीच्या जाग्याला कायच दिसलं न्हाई. त्येच्या वदल्यात मालकानं कोल्हापुरासनं जाऊन कसलातरी लोखांडाचा मुद्दा आणला नि त्यो इंजनाच्या पोटात घालून त्येचं पोट बोल्टांनी आवळलं.

सित्या अलिकडं जीभ नसल्यागत झाला हुता. त्येचं हात इंजनाचं अंग पुसून पुसून काळं झालं हुतं. हातांत बैलांचा कासरा जाऊन हांडेल नि पानं आलं हुतं... बैलं आता ठकली हुती. कवा त्येंच्या अंगावरनं कुणी हात फिरवायचं; कवा न्हाई. फुड्यात कवा कडब्याची धाटं असायची; कवा नसायची. हिरीतलं पाणी बिनढवळता इंजेन गपगार तसंच वडत हुतं. पालापाचुळा हिरीतच न्हाऊन कुजत हुता. पाणी गपगार. हळूहळू मचूळ हुईत हुतं. चव बदलून कुजत चाललं हुतं. हिरीला वाटत हुतं, आज ना उद्या आपलं कुजत चाललेलं पाणी ही बैलं आपल्या मोटनं ढवळतील नि पालापाचुळ्यासकट उपसा करून मन निवळसंख करतील... पर तिच्या मनात पू तसाच जमत चालला हुता नि हाडांचा हळूहळू मांडव करून बैलांचा जीव जगत हुता... सावलीत बसून ती इंजनाचा भूत भूत भूत भूत आवाज ऐकायची.

मांडवात इंजेन खोलत बसलेल्या सित्याला मालक म्हणाला, "सिताराम, बैलं इकून टाकू या."

"आणि हो !" ...हाताची घाण लागून सितारामचं तोंड काळं झालं हुतं.

"काय करायची ठेवून तरी ? एवढाएवढासा मळा. त्यांस्नी आता कुठं काम हाय ? भाड्याबिड्याची बैलं लावूनच वर-कामं करून घेता येतील म्हणं."

"बैलं हाईत तर मळ्याची लक्ष्मी हाय, मालक."

"पर त्यांस्नी आता बसून तरी किती दीस घालायचं रं? जाऊ द्यात तिकडं. दुसऱ्या कुणाच्यात तरी जाऊन खातीलबी नि राबतीलबी. कसं ?"

"..." चुना जास्त घालून सित्यानं तोंडात पान कोंबलं.

वाघऱ्यात मेंढरं कोंबल्यागत पिकं उनाच्या दणक्यात गुदमरून गप्प बसली हुती. त्येंच्या पायांत खालचं पाणी जिरून नुसता तेलकट वास ऱ्हायला हुता.

सूळगावचं हेडे आलं नि बैलांची दावी खुट्याला मिठी मारून खाली पडली. अंगं झाडून दोन्ही बैलं उठली. मालकानं म्होरक्या काढून घेटल्या... बैलांनी गपगार काढू दिल्या. सित्या गापदिशी आत गेला नि दुपारच्याला ठेवलेली भाकरी घेऊन आला. एकएक भाकरी दुमती करून बैलांच्या तोंडात दिली. ती त्येंनी गपागपा खाऊन टाकली. सित्याचं भाकरीचं हात काकर्वाची बोटं चाटल्यागत चाटलं... हेड्यांनी कासरं लावलं. जाता जाता रुप्या बैल ठेवलेल्या वारडीतलं पाणी प्याला.

गोठा मोकळा झाला. दावणीतली कडब्याची धाटं इसकटलेल्या तिरडीगत दिसत हुती नि सरणाची राख भरून न्हेलेल्या जाग्यागत वैरणीच्या व्हळीची जागा मोकळी झाली हुती. धाव जास्तच गुडघं गळ्यात घेऊन पाटाकडंला सरकली.

बैलासंगट वड्यापतोर जाऊन सिताराम हात हालवत परत आला... जाताना सोन्या बैल पोवट्या टाकत गेला हुता; त्यातली एक पोवटी त्येनं सोन्याचा तुकडा आणल्यागत हातातनं आणली हुती... पोवटी गोठ्यात टाकून तो कमरंचं हाड काढून न्हेल्यागत खोपीत झाऊन माट्करून बसला... खोंवाऱ्याला कान अडकलेला चावूक त्येच्याकडं डोळं लाकडाचं करून बघू लागला.

सकाळ झाली नि मालक इंजनाच्या नव्या रिंगा घेऊन मळ्याकडं आला. गाडी, कुळव, नांगर, वळचणीकडंची कोळपी गळं कापून न्हेल्यागत जिथल्या तिथं पडली हुती. मालक खोपीतनं इंजनाच्या मांडवात गेला. तिथं जळक्या कुर्डाईलचं तीन डबं कसाबानं चरबी भरलेल्या डब्यागत दिसत हुतं. मेलेल्या बैलाच्या पायाचं सांधं-हाड पडल्यागत हांडेल पडलं हुतं ते पायात अडकलं.

सिताराम कुठंच दिसला न्हाई... समदा मळा सुस्त.

"आयला ! दोनचार हजाराचं इंजेन टाकून गडी गेला वाटतं."...

असं म्हणून इंजनाच्या सामानावरनं मालकानं डोळं फिरवलं. समदं जिथल्या तिथं हुतं. इंजेन हिरीच्या कडंला पाण्याकडं डोळं लावून भूत बसल्यागत गप बसलेलं... मान उच्च करून आंव्याचं झाड काल बैलं कोणच्या बाजूनं गेली ते धावंवरनं बघत हुतं.

❖❖❖

**आनंद यादव**

खळाळ, आनंद यादव, मौज प्रकाशन, १९८७.
पृ. क्र. १५४ ते १६४,
(मौज प्रकाशन, मुंबई यांचे सौजन्याने)





अनुक्रमणिका

# शैलीलक्ष्यी निरीक्षणे तीन कथाकार :

*गंगाधर गाडगीळ, जी. ए. कुलकर्णी, आनंद यादव*

डॉ. सुरेश जोशी

शैलीलक्ष्यी समीक्षापद्धती मराठी वाङ्मयात अलिकडच्या काळात सुरू झाली आहे, मात्र ती अद्यापि पुरेशी रूजलेली नाही. शैलीमीमांसेचे तात्त्विक विवेचन डॉ. अशोक केळकर, डॉ. भालचंद्र नेमाडे, डॉ. रमेश धोंगडे, डॉ. मिलिंद मालशे यांनी केलेले आहे. पुढील काळात डॉ. धोंगडे यांनी शैलीलक्ष्यी उपयोजित समीक्षा केलेली आहे. प्रारंभीच्या काळात कवितेची शैलीलक्ष्यी उपयोजित मीमांसा अधिक प्रमाणात झाली. तुकारामाच्या कवितेची शैलीलक्ष्यी मीमांसा करणारे प्रबंधलेखनही डॉ. दिलीप धोंगडे यांनी केले आहे. पण गद्यलेखणीची शैलीलक्ष्यी समीक्षा, डॉ. रमेश धोंगडे यांच्या 'आत्मलक्ष्यी समीक्षा' (दिलीपराज प्रकाशन, १९९१) या पुस्तकाचा अपवाद वगळता, आधुनिक मराठी समीक्षेत विपुल प्रमाणात झालेली नाही.

आधुनिक मराठी वाङ्मयातील काही निवडक कथांचा शैलीलक्ष्यी रसास्वाद घेण्याचा प्रयत्न पुढील विवेचनात केला आहे. या निवडीमागे विशिष्ट असे सूत्र नाही. मात्र ग्रामीण-नागर, फॅण्टसीप्रधान-संज्ञाप्रवाहयुक्त अशी विविधता राखलेली आहे. स्वातंत्र्योत्तर काळातील श्रेष्ठ कथाकारांचीच निवड करण्यात आली आहे, अधिक व्यापक स्तरावरही कथागुच्छ निवडता येतील. तसेच एकाच लेखकाच्या अनेक कथांची निवड करूनही त्याची कथालेखनशैली तपासता येईल. प्रस्तुत लेखात तीन कथांची निवड केवळ नमुन्यादाखल आहे.

शैलीलक्ष्यी समीक्षा कोणत्याही साहित्यकृतीबाबत मूल्यप्रधान निर्णय देत नाही. चांगली, श्रेष्ठ, सफल, फसलेली अशा निर्णयाप्रत ती पोचत नाही. साहित्यकृतीच्या शैलीचा पोत तपासणे, कोणकोणती शैलीसाधने कशी कार्यरत आहेत, त्यांनी कोणता परिणाम साधला आहे हे शोधण्यात शैलीलक्ष्यी समीक्षेला अधिक स्वारस्य असते. परिणामी, साहित्यिकांबद्दल, त्यांच्या लेखन प्रेरणा व परंपरा याबद्दल कोणतीही विधाने न करता साहित्यकृती ही एक भाषिक कृती आहे, हे प्रधानसूत्र स्वीकारून ती संहितालक्ष्यी बनते. व्याकरणशास्त्र, अलंकारशास्त्र, भाषाशास्त्र किंवा वाङ्मयविद्या यांच्या निरीक्षणावर ती अकारण भर न देता त्यापैकी शैलीसाधने म्हणून ज्यांचा प्रभावी वापर झाला आहे, त्यांची ही समीक्षा दखल घेते. थोडक्यात, शैलीसाधनांचा पसारा तपासणे; आणि त्या अंगाने साहित्यकृतीच्या शैलीची जडणघडण समजावून घेणे, हे काम शैलीलक्ष्यी समीक्षा करते.

एखाद्या कथेची शैलीमीमांसा करताना केवळ शब्दरूपावर लक्ष्य केंद्रित करणे पुरेसे नाही. कथा-कादंबरीचा गद्यविस्तार लक्षात घेता ते शक्यही होत नाही. कथेची शैलीलक्ष्यी मीमांसा ही परिच्छेदावर, च्छेदकावर, खंडावर आणि त्यांच्या परस्परसंबंधावर लक्ष ठेवून करावी लागते. कथेतील वर्णने, भाष्ये, निवेदने, संभाषणे या बाह्यांगांबरोबरच कथेतील व्यक्तिरेखा, घटनाप्रसंग यांची आंतरिक संगती शोधावी लागते. रूपवादी समीक्षेच्या अंगाने जाणारे हे वळण वाटले, तरी शैलीसाधनांची अन्वर्थकता यामध्ये महत्त्वाची ठरते. त्यासाठी संहितेचे सूक्ष्मवाचन आवश्यक आहे.

पुढील तीन कथांचे १. 'खरं सांगायचं म्हणजे' (गंगाधर गाडगीळ), २. कैरी (जी. ए. कुळकर्णी), ३. इंजेन (आनंद यादव) शैलीलक्ष्यी रसास्वादात्मक विवेचन करताना त्या त्या कथांमध्ये शैलीदृष्ट्या जे जे लक्षणीय जाणवले त्यावर विशेष भर दिला आहे. त्यामुळे कधी सूत्रमय, कधी संक्षेपाने, कधी शैली साधनांची केवळ नोंद घेणारे, कधी रसग्रहणात्मक भाष्य असे विवेचनाचे स्वरूप भिन्न भिन्न ठेवले आहे.

प्रत्येक कथेची मूळ संहिता पुनर्मुद्रित केली आहे. आवश्यक तेवढा कथासारांश प्रारंभी दिला आहे. कथासंग्रहाचा संदर्भही दिलेला आहे.

**गंगाधर गाडगीळ यांची- 'खरं सांगायचं म्हणजे...'** ही घटनाप्रधान वा व्यक्तिप्रधान कथा नाही, त्यामुळे सार रूपाने सांगता येईल असे तिला कथानक नाही. महानगरी संवेदना टिपणाऱ्या आणि युद्धोत्तर

जगातील व बदलत्या जीवन जाणिवा व्यक्त करणाऱ्या काही गंभीर कथा गाडगीळांनी लिहिल्या आहेत तशाच मध्यमवर्गीय संस्कृतीचा उपहास-उपरोध करणाऱ्या विनोदगर्भ फॅण्टसीप्रधान कथाही त्यांनी लिहिल्या आहेत. 'खरं सांगायचं म्हणजे...' ही त्यापैकीच एक आहे. एका प्राध्यापकाच्या निवेदनातून मुक्त कल्पकता आणि उन्मुक्त विनोदाच्या अंगाने ती अभिव्यक्त होते. महायुद्धोत्तर महानगरी घडामोडींचा संदर्भ तिला आहे.

ही एक 'फॅण्टसी'प्रधान कथा आहे, हे लक्षात घेतले की तिचा शैलीविन्यास केवळ भाषिक अंगात सामावलेला नसून तो कथेतून व्यक्त होणाऱ्या एकंदर तपशिलातच अंतर्भूत आहे, हे ध्यानात येईल. प्रतिमा, प्रतीके, निवेदनाचा ढाचा, शब्द व वाक्यपातळीवरील नियमोल्लंघन इ. नेहमीची शैलीसामग्री या कथेत, तिच्या शैलीविन्यासात नाहीत, असे नाही; पण त्यांची दखलही फॅण्टसीच्या अंगाने व्यक्त झालेल्या तपशीलातूनच घ्यावी लागते.

'फॅण्टसी' ही वास्तवाचीच एक पातळी असते. वर वर असंबद्ध वाटणाऱ्या तपशीलामागे अर्थस्तराची एक संगती त्यामध्ये असते. तिची अतार्किक गुंफण तिचे असे त्या कथार्थापुरते एक नवे तर्कशास्त्र निर्माण करते. तिच्यातील पात्रे या मनोमय प्रतिमा असतात, आणि मानसिक स्वरुपाच्या घटना, नेणिवेच्या पातळीवर घडत असतात. त्यांना वास्तवाचा एक संदर्भ असतो, पण त्या मूलतः तर्कमुक्त असतात. साहचर्याच्या तत्त्वावर त्यांची अ-तार्किक गुंफण झालेली असते. म्हणून प्रथमदर्शनी अशा कथातील घटनांची साखळी, पात्रांचे वर्तन, निवेदकाचे भाष्य वगैरे पोरकट, उथळ वाटले तरी त्या मागे लेखकाची गंभीर जीवनदृष्टी असते. विडंबन, विनोदाच्या अंगाने ती सूचित होत असते. दैनंदिन जीवनाच्या उपचारबद्ध, तर्काधीनतेच्या काचातून मुक्त झालेले अंतर्मन अशा 'फॅण्टसी'मधून व्यक्त होते. वाह्यात आणि वावदुक वाटले तरी जीवनव्यवहारातील असंगती-विसंगती टिपण्याकडे त्या मनाचा कल असतो.

'खरं सांगायचं म्हणजे...' या कथा-शीर्षकापासूनच फॅण्टसीचा गंमतीदारपणा सुरू होतो. 'खरं सांगायचं म्हणजे...' तसं सांगायसारखं काही नाही; गहन, गंभीर, करुण, अंतर्मुख करणारं असं काही सांगायचं नाही; पण अवधान दिलंत तर सुचवायचं खूप आहे. असाच त्या शीर्षकातील त्या विरामचिन्हांचा (तीन टिंबे) अर्थ आहे.

'खरं सांगायचं म्हणजे...' ही एक बोलण्याची लकब आहे, असे शब्द नेहमीच मुख्यार्थाने घ्यावयाचे नसतात. हे या शीर्षकाने सूचित केलेलं आहे, समग्र कथेच्या व्यंग्यार्थाकडे अंगुलिनिर्देश केला आहे.

'असा माझा स्वभाव करारी आहे, आणि अशा मी अनेक अचाट गोष्टी करीत असतो. लोकांच्या मात्र हे ध्यानात येत नाही. कारण मी जनरीतीप्रमाणे टाय लावून लेक्चर देतो; आणि लोकांत चारचौघांसारखा वागतो.' (पृ. १००) निवेदकाचे हे उद्गार म्हणजे फॅण्टसीचा कथार्थ उलगडण्याची कळ आहे. 'जनरीतीप्रमाणे टाय लावणे', 'चार चौघांसारखा वागणे' ही त्याची नेहमीची प्रकृती आहे. ती जनरीतीवद्ध आहे. टाय प्रमाणे नीटनेटकं वागणारी आहे. कॉलेजात लेक्चर (भाषण देणं नव्हं. बरं!) देणारी आहे. लालपेन्सिलीनं मुलांना नापास करणारी ही व्यक्ती काही 'अचाट' करू शकते, हे लोकांना माहीत नाही. 'खरं सांगायचं म्हणजे...' ते पण त्याचं एक व्यक्तिमत्त्व आहे, तेच तर या कथेतून दाखवायचं आहे.

गाडगीळांच्या या कथेच्या रचनावंधातील ही कळ सापडली की फॅण्टसीचा अर्थ उलगडत जातो. हे 'कांचमुक्त' व्यक्तिमत्त्व किती स्तरांवर मुक्तपणे वावरते आहे, ते तपासता येते. त्यांची जुळणी करता येते, अर्थपूर्णता ध्यानी येते.

उबग आणणारी विद्वानांची भाषणे, क्रांतिकारकांची भडक व्याख्याने, तद्दन् खोटी स्वप्नं रंगवणारे चित्रपट, त्याच त्या चालीची गोड, गोड भावगीते, केवळ 'ऑर्डिनन्स' काढण्यात कर्तव्यपूर्ती मानणारे शासनकर्ते, वावदुक, वेल्हाळपणा करणारे भटजी, कडक भाषेत नोटिसा काढणारे वकील, वेंधळे प्राध्यापक, नवऱ्याला सोबत खेचून आणणाऱ्या आणि शेजाऱ्यांशी भांडणाऱ्या गृहिणी, कोर्टकचेरीचा टेंभा मिरवणारे बिऱ्हाडकरू, खोटा चंद्र, युद्ध, महागाई, ॲटमबॉम्ब अशा विविधस्तरांवर हे विदुषकी व्यक्तिमत्त्व मुक्तसंचार करते.

असामान्यांशी सलगी करण्याची सर्वसामान्य नागरिकाची सुप्त इच्छा, येथे लॉर्ड मौंटबॅटन, लेनिन-स्टॉलिन, हॅरी ट्रुमन यांच्या संदर्भात व्यक्त झाली आहे.

महायुद्धाचा सामान्यांना लागणारा अन्वयार्थ म्हणजे विद्ध्वंस करणारे अ‍ॅटमब्रॉम्ब आणि जीवनावश्यक वस्तूंची महागाई (दाढी करण्याचे पाते) ! कोर्टकचेरी म्हणजे घरमालकाविरूद्ध कडक भाषेत बोलण्याची जागा, असा सामान्यजनांचा समज असतो. अशा अनेक समज-अपसमजांना, फुशारकी व बढाई यांना प्रस्तुत कथेत अर्थपूर्णतेने चित्रित केलेले आहे. त्यासाठी विडंबन, वाक्प्रचार, लकबी, प्रतीके, शाब्दिक करामती यांचा उपयोग केलेला आहे.

सामान्यजनांच्या काही सहज लकबी असतात; मूठ आपटून बोलणे, हातवारे करणे, काडी चावणे ना काडीने कान कोरणे, पेन्सिल दातात धरणे, आल्या आल्या चहा विचारणे या लकबींचा या कथेतील वापर पाहण्यासारखा आहे. तसेच काही वाक्प्रचारांचे नियमोल्लंघन लक्षणीय आहे. उदा. अंडी घालणे, उद्धटपणे पंख फडफडवणे, 'उडत जा' म्हणणे, बॉम्ब झेलणे, हॅटमध्ये डोके ठेवणे इ.

चिमणी, मांजर, हत्ती (लाकडी व खरा) या प्राण्यांचा; हॅट, पागोटे, दाढीच पाते, चहा, मोरंबा, एरंडेल, रेडिओ या वस्तूंचा औपरोधिक वापर प्रतीकात्मक पातळीवर लक्षणीय ठरतो. तसेच चिमणी-कावळ्याची गोष्ट, गणिते न सोडवता येणारे पालक, भेटवस्तू म्हणून परदेशी हत्ती पाठवणे, तुकारामाचा अभंग व पागोटे, कोर्टकचेरी व समझोता, महायुद्धातील अ‍ॅटमबॉम्ब आणि दिवाळीतील अ‍ॅटमबॉम्ब यांचा असंगत संदर्भ कथार्थाची वृद्धी करतो.

विडंबनसुद्धा अनेक स्तरावर आढळते. नामविडंबन (टकले, हरि सोमण), व्यक्तिविडंबन (प्राध्यापक, वकील, गव्हर्नर, गृहिणी), वृत्तिविडंबन (आवेशपूर्ण बोलणे, कोर्टकचेरीची धमकी देणे), शब्दविडंबन (मुस्कराहट, मधुचंद्र मधील 'मध' तुमचा, चिमणी चित्कारणे, कायद्याच्या भाषेतील (व्हेअरअ‍ॅज'ची पुनरूक्ती) असे विविध प्रकार आहेत.

शेंगेच्या टरफलात व्यक्ती कोंबणे,किंवा पेन्सिलच्या टोपणात कोंबणे, बाटलीत वा बरणीत गायिकेला बसवणे, सिनेनायकाला ठोसा देणे, अ‍ॅटमबॉम्ब सहज हस्तगत करणे, अत्युच्च पदावरील व्यक्तीशी सलगीने वा मग्रुरीने बोलणे, क्षुल्लक गोष्टींसाठी कोर्टात खेचणे, बैठकीच्या खोलीत बसलेल्या मित्राची फजिती करणे या मनोनिर्मित घटना म्हणजे फॅण्टसीच्या आधारे असंज्ञ मनाची घेतलेली दखल होय.

अशा फॅण्टसीप्रधान कथांना आदि, मध्य, अंत असा विकासक्रम नसतो. स्वैरघटनांची असंबद्ध जंत्री तिथे पुरेशी असते. निवेदकाच्या दृष्टिकोनाची साखळी त्यामागे कार्यरत असते. या कथेमध्ये राजकारण, आंतरराष्ट्रीय घटना, सांस्कृतिक उपक्रम, घरगुती क्षुल्लक प्रसंगी यांना निवेदकाच्या अभिनिवेशयुक्त व्यक्तिमत्त्वाने, त्याच्या 'अहं'ने, मात करण्याच्या प्रवृत्तीने, आणि व्याज-युयुत्सुवृत्तीने बांधून ठेवले आहे.

भाषिक अंगापेक्षा तपशीलाच्या पसाऱ्यातून (अर्थात् तोही भाषांकितच असतो) शैलीविन्यास तपासत गेल्यास या फॅण्टसीची संपन्नता लक्षात येते.

विदुषकीछाया असलेला या कथेचा निवेदक गाडगीळांच्याच बंडूची जशी आठवण करून देतो, तशीच पूर्वपिढीतील चिं. वि. जोश्यांच्या चिमणरावाची आणि त्या आधीच्या पिढीतील श्री. कृ. कोल्हटकर यांच्या सुदाम्याची आणि व्याजोक्तिसंपन्न लेखन करणाऱ्या शि. म. परांजप्यांच्या 'ध्रुवबाळाच्या गोष्टीची' ही आठवण करून देतो. विनोदी-नायकांचा हा वारसा एकदा शैलीबळावरही तपासावयास हवा !

**जी. ए. कुळकर्णी यांची 'कैरी'** ही सुविख्यात कथा एका शालेय वयातील पोरक्या विद्यार्थ्याचे निवेदन आहे. त्याची आई वारल्यानंतर त्याच्या श्रीपूमामाने त्याला दूरगावी राहणाऱ्या तानीमावशीकडे पोचवले. अत्यंत वात्सल्यभावनेने या पोराचे संगोपन करून प्रतिकूल कौटुंबिक परिस्थितीतही त्याचे शालेय शिक्षण पूर्ण करण्यासाठी ती धडपडते. पण बाहेरख्याली नवऱ्याशी वादंग होऊन हतबल झालेली तानीमावशी त्याला परत मामाकडे पाठवते. त्या निपुत्रिक मावशीचे खचलेल्या मनोवृत्तीतच निधन होते. 'माय मरो पण मावशी जगो' असे म्हणण्याएवढे सुद्धा भाग्य नसलेल्या त्या संवेदनशील पोरक्या पोराची भावव्याकुळ कहाणी 'कैरी' कथेत आहे.

सुमारे तीसबत्तीस पृष्ठांच्या 'कैरी' या कथेच्या पात्रमुखी निवेदनात अनेक घटना-प्रसंग, पूर्वस्मृती, बाह्यसृष्टीदर्शन, व्यक्तिरेखा आणि त्यांचे संभाषण, निवेदकाचे भाष्य यांचा विपुल वापर आहे. कथावस्तूचा एकंदर पसारा घटनांच्या आणि भाष्याच्या अंगाने

नोंदवायचा झाला तर सुमारे सत्तरएक टप्पे दाखवता येतात. विद्यार्थीदशेतील निवेदक आणि त्याच्या दृष्टिकोनातून चित्रित झालेली तानीमावशी, श्रीपूमामा, भाऊराव, तुळसा, देशपांडे मास्तर, जाधवमास्तर या व्यक्तिरेखा एकंदर कथनशैलीची घडण (स्ट्रक्चर) उभी करतात. लहानमोठ्या घटनांची साखळी, कैरी, सीताफळ, मोर वगैरे प्रतीके आणि वातावरण चित्रण यामुळे त्या व्यक्तिरेखा स्पष्ट होत जातात.

निवेदक-पोराला मातृवियोगाच्या दुःखद पार्श्वभूमीवर मावशीचा सहवास लाभतो, तिची वात्सल्यचिंब माया लाभते; आणि आकस्मिकपणे त्या दोघांची ताटातूट होते, ती भावव्याकुळता 'कैरी' या कथेची प्रधान भाववृत्ती आहे. कथालेखकाने घटनानुक्रम त्या अंगाने मांडला आहे. पोराचा मातृवियोग, मामाने त्याला मावशीकडे पोचविणे, तिने वात्सल्यप्रेमाने त्याला आपलेसे करून त्याच्या शाळेची व्यवस्था करणे, नवऱ्याच्या विरोधाला न जुमानता त्याचा सांभाळ करणे, मास्तरांकडून होणाऱ्या अपमानास्पद वागणुकीला खंबीरपणे तोंड देणे, स्वतःचे जगणेच व्यर्थ झाल्यावर हतबल होऊन त्या पोराला मामाकडे परत पोचवणे आणि अखेरी तिचा अंत- असा हा घटनाप्रवाह आहे.

निवेदनप्रधानता हा कथेचा कणा असल्याने निवेदकाच्या दृष्टीचा, त्याच्या जीवन आकलनाचा, ग्रह-आग्रहांचा परिणाम कथान्तर्गत जीवनभाष्यावर, वर्णनांवर आणि व्यक्तिव्यक्तीसंबंधावर होतो. निवेदकाचे वय आणि नातेसंबंध लक्षात घेऊनच कथार्थाकडे वळावे लागते. निवेदनाची सूत्रे एकदा त्या कथेतील पात्राकडे लेखकाने सोपवली की त्या चौकटीबाहेरील भाष्यासाठी त्याला इतर साधनांचा आधार घ्यावा लागतो. कधी निसर्गचित्र, कधी पत्रे, कधी संभाषणे, कधी उक्त-अनुक्त प्रतिमा-प्रतीके यांचा त्यासाठी उपयोग करावा लागतो.

'कैरी' या कथेमध्ये तानीमावशी व आई यांचा भावसंबंध प्रकट करण्यासाठी मामाशी झालेले संभाषण, त्या पोरावर माया करताना जागृत झालेल्या तिच्या पूर्वस्मृती यांचा आधार घेतला आहे.

भाऊराव-तुळसा यांच्या अनैतिक संबंधाची कल्पना देण्यासाठी प्रत्यक्षवर्तनचित्रण, गाठीभेटी, संघर्षप्रसंग यांचा उपयोग लेखकाने केला आहे. पोरवयातील निवेदकाच्या भाष्यावर विसंबून राहणे वास्तव झाले नसते. शाळेतील मुले, देशपांडेमास्तर यांच्याबाबतही प्रत्यक्षचित्रणावर भर आहे; जाधवमास्तरांची व्यक्तिरेखा मात्र त्यांच्या प्रत्यक्ष बोलण्यातून साकारली आहे.

प्रतिमा-प्रतीके यांचा उचित वापर प्राधान्याने भाचा-मावशी संबंध उलगडण्यासाठी, भावविनिमय प्रकट करण्यासाठी झाला आहे. दोघांच्या आंतरिक भावगर्भतेला त्यांचा यथार्थ उपयोग झाला आहे. 'मोर'दर्शनाचा वारंवार येणारा उल्लेख हा त्या बालमनाच्या अतृप्त भाववृत्तीचा दर्शक आहे. 'जे हवं हवंसं वाटतं ते आपलंसं होत नाही, इतरांना मात्र ते अकल्पितपणं सहज प्राप्त होतं, आपण मात्र ती संधी वेळोवेळी गमवावी, याचे दुःख केवळ मोरदर्शनापुरते मर्यादित रहात नाही; आई, मावशी, सुम्मी यांचा लळा प्राप्त होण्या-न होण्याबाबतही ते खरे आहे. शाईचा डाग पुसला जात नाही म्हणून जोडलेले शर्टावरचे फुलपाखरू आणि त्याचे कौतुक हा एकमेव विरंगुळा त्या बालमनाच्या वाट्याला आला आहे.

'कैरी' हे मध्यवर्ती प्रतीक आणि त्याचा सहलीच्या पूर्तता-अपूर्तता याशी असलेला संबंध, तसेच आई-मावशी यांच्या बालपणाशी असलेली कैरीची हृद्यता, त्यामधून व्यक्त होणारा बालमन-स्त्रीमन-सुलभतेचा नातेसंबंध फार सूक्ष्मतेने लक्षात घेण्यासारखा आहे.

अशा आणखी अनेक शैलीखुणा या कथेत पानोपानी आढळतात. राजेसाहेबांची विहीर आणि त्यामध्ये वास करून असलेले पारवे हे बालमनातील गूढतेचे व अतर्क्यतेचे आकर्षण सूचित करते. मामाची तुटलेली वहाण आणि त्याच्या आयुष्याची वाताहत व दारिद्र्य; मावशीच्या दारातील दोनच काळवंडलेली फळे असलेले सीताफळाचे झाड आणि तिची अधुरी अपत्यलालसा, तिच्या हनुवटीवर गोंदलेले हिरवे टिंब निवेदकाच्या बालमनातील आकर्षण सुचवते.

निवेदनाच्या आणि संभाषणाच्या ओघात येणारी प्रतिमासदृश्य शब्दयोजना आणि प्रतिमा यांनीही या कथेचा शैलीपट भरजरी अन् भावसमृद्ध केला आहे. कथेचे कोणतेही पान उघडावे आणि त्या प्रतिमा-श्रीमंतीचा आनंद घ्यावा, अर्थात् समग्र कथेच्या

संदर्भातच ! उदा. मावशीने निवेदकाच्या आईला मायेने 'झगडघंटी' असे म्हणणे; मावशीला बघताच 'कंटाळा धुवून गेला, आणि थंडीत गरम कोट घातल्यासारखे वाटले' असा प्रत्यय देणे; चालून पाय पिळ्याप्रमाणे झाले; सुम्मीचा विषय काढताच 'खेळता खेळता भुताची खोली उघडू नकोस' असे मावशीने म्हणणे; तुळसाने दुरूत्तरे करताच मावशी 'विझल्या'सारखी झाली; नवऱ्याशी भांडता भांडता मी काही 'पांडव पंचमीतील गौळण नाही' असे तिने म्हणणे; तिच्या 'आयुष्याची निरीच' सुटणे- अशी अर्थवैभवपूर्ण शब्दयोजना ओंजळ ओंजळ भरून लुटावी, एवढी ती भरघोस आहे. शैली म्हणजे शब्दनिवड असे का म्हणतात, याचा प्रत्यय अशा कथेत वारंवार येतो.

कथेच्या एकंदर संरचनेत स्थळ या घटकाला वातावरणनिर्मितीच्या संदर्भात महत्त्व असते. जी.एं.नी त्याचा किती समर्पकतेने उपयोग केला आहे ते तपासता येते. या कथेमध्ये तानीमावशीचे घर, श्रीपूमामाचे घर, देशपांडे मास्तरांची शाळा, जाधवमास्तरांची शाळा, पूर्वस्मृतीतील आई व सुम्मीच्या वास्तव्यातील घर, दवाखान्याचा परिसर, राजेसाहेबांची विहीर, आणि सभोवतालचे रान, शाळेचा रस्ता व झाडेझुडपे या स्थळांचा उपयोग कथार्थाच्या वृद्धीसाठी झाला आहे. निवेदकाचे विद्यार्थीपण लक्षात घेता घर आणि शाळा यांना अग्रक्रम मिळणे स्वाभाविक आहे. मावशीच्या मनातील भाच्याच्या शिक्षणाबद्दलचे अगत्य, भाच्याचे पाठांतरप्रभुत्व आणि सुंदर हस्ताक्षर यांच्या निर्देशामुळे घर आणि शाळा विशेष अर्थपूर्ण ठरतात. पहिली शाळा प्रतिकूल तर दुसरी अनुकूल ! मास्तरांचेही तसेच मामा आणि मावशीने भाच्याची अभ्यासाची पुस्तके, दप्तरपाटी यांची काळजी घेणे आणि जाधवमास्तरांनी त्याला लेखनप्रवृत्त करून मावशीच्या व्यक्तिरेखेचा लेखनपातळीवर विचार करावयास लावणे हा अनुबंध अतिशय लक्षणीय आहे. त्या संदर्भात 'मोर' आणि 'कैरी' या प्रतीकांना भावबळ लाभते. सहलीला जाणे आणि मावशीवरील लेखन मास्तरांना दाखवणे हे त्या पोराचे दोन्ही मनसुबे अधुरेच राहतात, याला स्थलांतर हेच कारण ठरावे ना ?

व्यक्तिरेखा आणि घटनाप्रसंग यांची प्रतिमा, प्रतीके, उपमा, रूपके यांच्याद्वारा केलेली गुंफण हा शैलीच्या रचनाबंधाचा, तिच्या जडणीघडणीचा भाग असतो. लेखकाची कथावस्तूवरील पकड जेवढी प्रभावी असते त्याप्रमाणे तो या शैलीसाधनांचा प्रभावी वापर करतो. मध्यवर्ती प्रतीकांची पुनरूक्ती करतो. एखाद्या धृ'पदाप्रमाणे त्यांचे अधोरेखन करतो. 'कैरी' आणि 'मोर' या प्रतीकांची पुनरूक्ती याद्दृष्टीने लक्षात घेण्यासारखी आहे.

''...ती आनंदाने हसेल, तिच्या हनुवटीवरील हिरवा गोंदलेला ठिपका, आंगठीतल्या हिरव्या खड्याप्रमाणे चमकेल... ती खात्रीने हसेल; आणि त्यावेळी, आत्ताच आपण झाडावरची ऊबदार कैरी झाल्याप्रमाणे मोहरातल्या लहान गोटीसारखी दिसणारी तिची हनुवटीवरील हिरवी खूणदेखील तानीमावशीबरोबरच अगदी सुरेख हसेल.

''तोच कोणी तरी 'मोर ! मोर !' म्हटले व दुसऱ्या बाजूच्या खिडक्यांकडे माणसांनी गर्दी केली. मी देखील उठलो, पण वाकून पहात असलेल्या माणसांच्या गर्दीत मला खिडकीपर्यंत देखील पोचता आले नाही...

... पंचवीस मोर, आपले डोळे असलेला हिरवट पिवळा पिसारा, आणि निळी मान मिरवत समोरून झग्‌दिशी आले होते; आणि झग्‌दिशी निघून गेले होते. पण मला मात्र ते पाहायला मिळाले नाहीत.'' (पृ. ८१)

'कैरी' आणि 'मोर' या दोन प्रतीकांवर अवघी कथा तोलून धरली आहे. मावशीच्या वात्सल्यासाठी आसुसलेले मन आणि त्या बालमनाची कैरी, मोर, मोरपीस याबद्दलची रस-दृक्-स्पर्श लालसा संवेदना-प्रतीती देते. दोघांच्या भाववृत्तीचे दर्शन घडवते. कथार्थाची वृद्धी करते. 'उबदार कैरी हसणे' आणि मोरांनी 'झग्‌दिशी' येणे-जाणे, या शब्दयोजना तर कवितेच्या रेशमी शैलीवस्त्रातच शोधाव्यात !

''...कारण तानीमावशी गेली, व जाताना माझी मीठ तिखटाची कैरीच ती आपल्याबरोबर घेऊन गेली.'' या भावोद्‌गाराने शेवट होणारे कथेचे शेवटचे दोनतीन परिच्छेद म्हणजे कार्यप्रवण कथनशैलीचा अत्युच्चबिंदूच होय. बेतलेल्या कथारचना तंत्रापेक्षा (आणि मंत्रापेक्षाही) प्रभावी असा हा शेवट आहे.

जी. ए. कुळकर्णी यांच्या कथेतील उपमा आणि रूपके

यांचे मापन करून त्यांचे शैलीविन्यासातील स्थान निश्चित करण्याचा अभ्यासपूर्ण प्रयत्न डॉ. रमेश धोंगडे यांनी त्यांच्या 'आत्मलक्षी समीक्षा' (दिलीपराज प्रकाशन १९९१) या ग्रंथात (पृ. १२०-१७९) अत्यंत तपशिलाने केला आहे. अनेक निरीक्षणे नोंदवली आहेत. प्रतिमा, प्रतीके, उपमा, रूपके यांची वर्गवारी केली आहे. 'कैरी' कथेच्या संदर्भातील त्यांचे विवेचन लक्षात घेण्यासारखे आहे.

**आनंद यादवांच्या 'इंजेन' या ग्रामीण कथेत** शेतगडी म्हणून काम करणाऱ्या सित्याची व्यथा कथन केली आहे. शेत आणि शेतपसाऱ्याकडे केवळ पैशाच्यादृष्टीने पाहणाऱ्या शेतमालकाने पारंपरिक मोटेच्या जागी विहिरीतून जलद आणि मुबलक पाणी खेचणारे इंजिन शेतात आणले आणि वर्षानुवर्षे स्वामीनिष्ठेने राबणाऱ्या बैलांची उपेक्षा होऊ लागली. सित्यागड्याला ते मुळीच आवडले नाही. पण आपली नाराजी, तो मालकापुढे स्पष्ट बोलू शकत नव्हता. निर्जीव इंजिनाची ऐट आणि खर्च वाढता राहिला तशी बैलांची आबाळ होऊ लागली. अखेरी मालक ती बैलजोडी विकून टाकतो. बैल म्हणजे शेतातील लक्ष्मी असे मानणारा सित्या व्यथित मनाने ते शेत सोडून जातो. अवघे भावविश्व हरवून बसतो.

या कथेचे काही शैलीविशेष प्रथमदर्शनी नजरेत येतात, ते असे-

१. हे ग्रामीण बोलीभाषेतील लेखकमुखी निवेदन आहे. संभाषण, वर्णन, भाष्य यापैकी कशातही नागरभाषा आलेली नाही.

२. ग्रामीणबोलीत व्यंजनबदल (घातली ऐवजी घाट्ली), स्वरबदल (आट्प ऐवजी आटोप) शिवाय विपुलतेने आढळणारे शब्दरूप बदल (नेतात ऐवजी न्हेत्यात, सौभाग्य ऐवजी सोभाग) तसेच वाक्यविन्यासात छोट्या छोट्या वाक्यांचे प्राबल्य, क्रियापदांचा लोप झालेली वाक्ये, तालबद्ध वाक्ये यांचा निर्देश करता येईल.

३. दहापृष्ठांच्या या कथेत संभाषणांचा विपुल वापर आहे. सित्यागडी व मालक यांच्यातील संभाषणे पानापानावर आहेत. शिवाय लेखकमुखी निवेदनाचा बाज सित्याच्या मनोगतासारखाच आहे; नव्हे, तोच प्रभाव साधायचा आहे. त्या मनोगतान्तर्गत घटनांची साखळी-जुळणी शोधायची झाली तर वीसबावीस घटनाक्रम नोंदवता येतील. पण कथावस्तूचे प्रमुख टप्पे सहासातच आहेत. जसे, १. इंजिन आलेले आहे ते बैलगाडीतून शेतात आणावयाचे, २. इंजिन बसवण्याचा खटाटोप, ३. इंजिनचा पाणी उपसा सुरू. ४. दिवसेंदिवस इंजिनचा वाढता खर्च, ५. इंजिनाच्या आगमनामुळे विहीर, मोट, बैल यांची दुर्दशा, ६. इंजिनाचा खर्च भागवण्यासाठी बैल विकण्याचा निर्णय आणि ७. बैलांच्या जाण्यामुळे अस्वस्थ होऊन सित्यागड्याने गायब होणे.
'इंजिनमुळे सारे' असा या कथेतील घडामोडींचा इत्यर्थ आहे.

४. इंजिनामुळे भरभराट आणि समृद्धी येण्याऐवजी समग्र

---

शेताला अवकळाप्राप्त झाली; आणि भावविश्व उद्ध्वस्त झाले या कथार्थाचा निर्देश करणारे मृत्यूसूचक अनेक शब्द निवेदनात वारंवार येतात. उदा. इंजिनाची पेटी गाडीत उचलून ठेवताना 'मेलेल्या जनावराला उचलावं... मढं उचलल्यागत' असं वर्णन; इंजिनामुळे बैलांचे सौभाग्य हरवले, असे वाटणे, रिकामी मोट जीव काढून घेतल्यासारखी भासणे; तेलाचे बॅरेल ही मुंडकं तुटलेल्या जनावराच्या मुड्द्यागत वाटली; धाटं तिरडीगत विस्कटलेली; हाडांचा मांडव, असे अनेक शब्द उपमा-रूपकाच्या अंगाने मुख्य भाववृत्तीचे, अवकळेचे सूचन करतात.

५. 'इंजेन' या कथेच्या एकंदर शैलीविन्यासात उपमा-रूपके, प्रतिमा-प्रतीके यांचा स्वाभाविक उपयोग आढळतो. ती विपुल आहेत, पण अंगसरशी असल्याने अ-वाजवी वाटत नाहीत.

६. अर्थव्यवहाराच्या पातळीवर 'इंजिन' या प्रतीकाने आणि इतर शैलीसाधनांनी सफल कामगिरी केलेली आहे. इंजिन हे यंत्रयुगाचे प्रतिनिधी. पारंपरिक कृषिसंस्कृतीवर मात करणारे. माणूस, प्राणी, वनस्पती या परस्पर संबंधातील भावविश्वावर आघात करणारे आहे. निर्जिव इंजिनाची सजीव घटकांवर मात आणि सर्वत्र आलेली अवकळा, या मुख्य भाव परिणामाच्या दिशेने कथेचा सारा तपशील कार्यरत राहतो. परस्परविरोधी घटक दिमतीला धरले जातात. सित्यागडी-मालक, बैल-इंजिन हे त्यापैकी प्रमुख. एक भावमय तर दुसरे भावनाशून्य असे आहेत. शिवाय एकंदर कथेतून सूचित होणारे भरभराटीचे स्वप्न विरूद्ध प्रत्यक्षातील अवकळा हे विरोधीचित्र शोकात्मभाव प्रकट करणारे आहे.

शैलीविन्यासाचे एक दोन नमुने तपशीलाने पाहू.

'मालकाला घाई हुती. सित्याला मालकी नव्हती... त्यो नि बैल एकाच दावणीतली' पृ. १५९.

'मा' वाक्यातील ठेका अर्थवृद्धी करणारा आहे. होती आणि नव्हती यामधून दोघांच्या असतेपणाची कल्पना येते. मालकाकडे मालकी होती पण सफलता नव्हती, भावपरता नव्हती. सित्यागडी मालक नव्हता, पण बैलांवर आणि एकंदर शेतपसाऱ्यावर त्याची भावनात्मक सत्ता होती; पण निर्णयाचे अधिकार नव्हते. मालकाच्या दृष्टीने सित्यागडी व बैल हे एकाच 'दावणीत'ले या शब्दयोजनेतून त्याची दृष्टी यथार्थतेने सूचित केली आहे. (पृ. १५९) शिवाय मधील जागा तीन टिंबांनी सूचित केली आहे. ती रिकामी जागा भरून काढण्यास भरपूर अवसर आहे. मालकाचे गड्याबाबत मत, त्याचे मालकाच्या फायदेशीरपणाबद्दलचे मत, बैलांकडे माणुसकीच्या दृष्टीने पाहण्याची दृष्टी, बैलांच्यावाट्याला येणारी निव्वळ मेहनत, असे अनेक भाव त्या रिकाम्या जागेत भरता येतात. ललित लेखनातील मोजक्या शब्दांचे, अर्थसंक्षेपाचे सामर्थ्य समजते.

एखादी अर्थपूर्ण प्रतिमा अवघ्या संवेदना घेऊन अवतरते. "...उनाची उसळलेली कायील त्येंच्या उघड्या अंगावर वतत हुती" (पृ. १५५) या प्रतिमेने बैलांची क्लेशकारकता केवढी विकोपाला पोचली होती याची संवेद्यजन्य कल्पना आणून दिली आहे. आधीच मध्यान्हीचे ऊन, मोट हाकून झाल्यावर बैलांना विश्रांती मिळालेली नाही, ते धापा टाकीत गाडी ओढत आहेत, उसळलेली कायील या शब्दाने त्यामधील होरपळलेपणाची कल्पना येते. 'उसळलेली कायील अंगावर ओतणे' यामधील 'ओतणे' या क्रियापदाने (वतत हुती) तर त्या यातनांची भयावहता आणि बैलांच्यावर हे कष्ट मुद्दाम लादले गेले आहेत, याची जाणीव त्यामधून होते. त्या कष्टप्रदतेबद्दलही अधिक काही सांगावे लागत नाही. सित्याचा बैलाबद्दलचा कळवळा त्या प्रतिमेमधून पुरेपूर प्रत्ययाला येतो, आणि पुढील परिच्छेदात बैलांच्या कष्टांनी जी समृद्धी आणल्याचा निर्देश आहे (पृ. १५५, शेवटचा परिच्छेद) तो मनावर अधिकच ठसतो.

सित्याच्यादृष्टीने ते केवळ बैल नाहीत, ती सोन्यारूप्याची जोडी ही 'इंदराच्या ऐरावतागत पांढरीधोट जोडी' म्हणजे भूपुत्राचे वैभव आहे. साला-सालाला लक्ष्मी घरात आणणारे ते ऐरावत आहेत. बेंदूरच्या सणाला त्यांना देव समजून त्यांची पूजा मालकानं केली की त्यांना सगळं पावलं. कष्टाचे विस्मरण होई. अशा या चित्रणातून सित्याचे सश्रद्ध अंतःकरण आणि कृषिवैभवाकडे पाहण्याची त्याची भावदृष्टी समजते.

अशा या बैलांची उपेक्षा करून त्यांच्याच कष्टाने 'इंजेनाचे धूड' मालक मळ्यात आणतो. बैलांचा मांडव

इंजिनावर घातला जातो. सित्याला हे पाहवत नाही. ''नव्यानं घाटलेल्या मांडवात इंजेन काळाघूस न्हवरा बसल्यागत दिसत होतं ... जलमभर त्याच्यासंगं नांदायची पाळी हिरीला येणार हुती'' (पृ. १५९) ही त्याची प्रतिक्रिया केवढी तरी स्वाभाविक आहे. इंजिनाबद्दलचा त्याचा तिरस्कार त्यामधून व्यक्त होतो. असे अनेक उल्लेख या कथेत सर्वत्र विखुरलेले आहेत.

एकंदरच या कथेतील प्रतिमा योजना अत्यंत सहजतेने अवतरलेली आहे. बोली भाषेची मार्दवता आणि भाबडेपणा त्यामधून अधिक जाणवतो. गडी कष्ट करत होता आणि मालक विनकामाचा बसून होता याचा उल्लेख ''एका दगडावर दुसरा दगूड चिकटून ठेवल्यागत मालक बसला हुता'' (पृ. १५८) अशा शब्दात होतो, तेव्हा प्रत्ययकारकता सचित्र होते. अमानवी घटकांचे मानवीकरण तर या कथेत वारंवार केलेले आहे, पण ते कोठेच कृत्रिम वाटत नाही. इंजिन गाडीत वसून मळ्यात आले; आणि त्या नव्या आगंतुक पाहुण्याकडे झोपडी कशी पहात होती तर ''खोप वळचण डोळ्यावर धरून गाडीतल्या पेटीकडं बारीक बारीऽक बघत होती. (पृ. १५७) वैल निघून गेल्यावर ''खोंबाऱ्याला कान अडकवलेला चावूक त्येच्याकडं डोळं लाकडाचं करून बघू लागला'' (पृ. १६२). वैलांचा मांडव काढून घेतल्यावर'' बाभळीनं त्येंच्यावर शिऱ्यांचा पदूर पसरला होता.'' (पृ. १५८) असेच मानवीकरण विहीर, मोट, दावं वांधण्याचे खुंटे, आंब्याचे झाड वगैरे बाबत यथार्थतेने आढळते. उपमा, रूपके, प्रतिमा यांची सहजगत्या गुंफलेली वीण हे 'इंजेन' या कथेच्या शैलीविन्यासाचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. चिंतनपरता अथवा भाष्य यासाठी वेगळी भाषिक घडण, स्वतंत्र परिच्छेद यांची आवश्यकता नाही. कारण सित्यागड्याच्या भावप्रकटीकरणात ते अंशतः अंगभूत आहे, आणि तेवढे पुरेसे आहे. नागर वाचकांच्या उद्‌वोधनासाठी वा रंजनासाठी कथालेखन केले जात आहे याचे अकारण भान लेखकाने ठेवले असते तर निवेदनाचा बाज विघडला असता, भावसंवर्धनाची लय बिनसली असती. विनाशाचे सूचन करणारी शब्दांची पेरणी प्रारंभापासून अखेरपर्यंत झाल्याने शोकात्मघाट निर्माण झाला आहे. अनपेक्षित कलाटणी देणारा अखेरचा प्रसंग निवडावा लागला नाही. व्यक्तिरेखा, घटना-प्रसंग, वातावरण, संघर्ष हे कथेचे प्रमुख घटक परस्परात एकजीव करण्यात भाषिक संहितेने मोठे यश मिळविले आहे.

❖❖❖

**डॉ. सुरेश दामोदर जोशी**
'मानसी', मधली आळी,
देवरूख ४१५ ८०४.

---



# विनम्र श्रद्धांजली !



## डॉ. स. रा. गाडगीळ

मराठी साहित्यात शोकात्मिकेचे सर्वांगाने विवेचन करणारे तसेच भारतीय धर्म विचार, संतांचे विचार यांची सांगड घालणारे व्यासंगी, प्रज्ञावान, मराठीचे प्राध्यापक आणि पीपल्स कॉलेज, नांदेडचे प्राचार्य डॉ. सदाशिव रामचंद्र तथा डॉ. स. रा. गाडगीळ यांचे वयाच्या ९२व्या वर्षी नुकतेच निधन झाले. म.सा.परिषदेत त्यांच्या नावाने समाजशास्त्र विषयातील उल्लेखनीय ग्रंथास पारितोषिक दिले जाते. त्यांना विनम्र श्रद्धांजली !

- संपादक

# महानगरी कथात्म साहित्य (कथा-कादंबरी)

प्रा. संजय नगरकर

कथात्म साहित्यात चिंचोळा अवकाश असलेला 'लघुकथा', मध्य 'लघुकादंबरी' व मोठा अवकाश असलेला 'कादंबरी' हे साहित्यप्रकार समाविष्ट होतात. मराठी कथात्म साहित्यात महानगरी संवेदना ताकदीने मांडणारे भाऊ पाध्ये हे बिनीचे मानकरी. अर्थात् त्यापूर्वी देखील गंगाधार गाडगीळ, अरविंद गोखलेंसारख्या कथाकारांनी महानगरीय बदलते संवेदन कथांमधून मांडण्याचा प्रयत्न केला त्याबाबत गो. पु. देशपांडे म्हणतात त्याप्रमाणे, ''कादंबरीला मोठा कॅनव्हास लागतो. हरवलेल्या आभाळाचा शोध घेण्याची क्षमता आपल्या उच्चवर्गीय लेखकांकडे नव्हती.'' ही परिस्थिती १९७० नंतर पूर्णपणे वदललेली दिसते.

गंगाधर गाडगीळांच्या 'किडलेली माणसे', 'भागलेला चांदोबा', 'तलावातील चांदणे' सारख्या कथांनी महायुद्ध व स्वातंत्र्योत्तर शहरी माणसाच्या मानसिक किडलेपणालाच हात घातला. मर्ढेकरी कवितेचा प्रभाव त्यांच्या कथेवर जागोजागी पडलेला दिसतो. किंबहुना तो त्या काळचा युगधर्मच त्यांच्या कथेतून उमटलेला दिसतो. अरविंद गोखल्यांच्या 'मंजुळा', 'कातरवेळ', 'अनय', 'रिक्ता', 'विघ्नहर्ता' यासारख्या कथांमधून मध्यमवर्गीय महानगरी संवेदन व्यक्त होताना दिसते.

याबावत के. ज. पुरोहित म्हणतात, ''महानगरीकरणाची प्रक्रिया सुरू झालेल्या मुंबईसारख्या शहरातील यांत्रिक जीवनाच्या चक्रात अडकलेल्या, ताणात, ओढगस्तीत जगणाऱ्या उखडलेपणाची, स्वप्न हरवत चालल्याची, नैतिकदृष्ट्या संभ्रमित जाणीव व पदरी आलेल्या निराशेचे चित्रण गाडगीळांप्रमाणे गोखले यांच्या कथेतही आढळते.''

नवकथेच्या रुपाने ही परंपरा पुढे साठोत्तरी कालखंडात अधिक धाडसी व वास्तवप्रधान झालेली दिसते. अनिल डांगे, भाऊ पाध्ये, विलास सारंग, मेघना पेठे, वासंती मुजुमदार आदी कथाकारांनी महानगरीय संवेदना समर्थपणे आपल्या कथांमधून मांडल्या.

अनिल डांगे यांनी 'साधू वाण्याची नाव', 'पांघरुण', 'आमिष' या सारख्या कथांमधून औद्योगिक क्षेत्रातले तणाव व मानवी अस्तित्त्वापुढील प्रश्नांना शब्दांकित केले आहे. भाऊ पाध्ये कथेपेक्षा कादंबरीक्षेत्रात आपला ठसा उमटवून गेले. दिलीप चित्रे यांनी 'ऑर्फिअस', 'स्कॉर्पिओ', 'केसाळ काळेभोर पिल्लू', 'तिडीक, तिरडी, अनंत काळ', यांसारख्या कथांमधून निर्भिडपणे मानवी अस्तित्त्वाच्या प्रश्नांना हात घालतात. त्यांच्या कथाशीर्षकातूनच आधुनिकतेचा प्रभाव लक्षात येतो.

विलास सारंग यांनी 'गर्भवती', 'गिधाडे', 'आतंक' यासारख्या कथांमधून आधुनिकता व वैश्विकतेचे प्रश्न मुखरित केलेले आहेत. स्त्रीकथाकारांबद्दल बोलायचे तर वासंती मुजुमदार व मेघना पेठे या व्यतिरिक्त शहरी मानसिकता समर्थपणे मांडणारी नावे विरळाच.

मेघना पेठे यांच्या 'नातिचरामि', 'आंधळ्याच्या गायी', 'हंस अकेला' यासारख्या कथासंग्रहांमधून सर्वांगीण दृष्टीने सामाजिक समस्यांवर प्रकाश टाकला. त्यामुळेच त्या स्वतःला केवळ महानगरी लेखिका म्हणून संबोधण्यास विरोध करतात; तर के. ज. पुरोहित त्यांच्या कथेतील आशयबंधावर भाष्य करताना म्हणतात, ''मुंबईतल्या वाढत्या दगडी वस्त्यांतील सर्व तऱ्हेच्या भुकांचे तांडव चित्रित करणारी त्यांची कथा दगडात फूल उगवावे अशी आहे.''

कथेपेक्षा कादंबरीक्षेत्रात महानगरी संवेदनांचे चित्रणाबाबत आशावादी परिस्थिती आहे. विशेषतः १९७० नंतर महानगरी कादंवरीचे क्षेत्र अधिक समृद्ध व ठसठशीत झालेले दिसते.

खालील आलेख जरी डोळ्याखालून घातला तरी याची साक्ष पटते.




१) भाऊ पाध्ये - 'वणवा' 'राडा' 'अग्रेसर', 'होमसिक ब्रिगेड' भोगलुलपता, लैंगिकता.
२) सुभाष भेंडे - 'अंधारवाटा'- 'किनारा', 'बॉनसॉय', 'अदेशी'.
३) शांता गोखले - 'रिटा वेलिणकर' - बहुस्तरीय स्त्रीपुरुषसंबंध.
४) गौरी देशपांडे - 'मुक्काम' - परदेशी महानगरातील वक्तिकेंद्रितता.
५) ह. मो. मराठे - 'सॉफ्टवेअर' 'कलियुग', 'मार्केट', 'इतिवृत्त, कारखानदारी, बहुराष्ट्रीय कं.'
६) संजय जोशी - 'नचिकेतचे उपाख्यान', 'इतिवृत्त, कारखानदारी, बहुराष्ट्रीय कं.'
७) संजीव खांडेकर - 'अशांत पर्व' 'इतिवृत्त, कारखानदारी, बहुराष्ट्रीय कं.'
८) अरुण साधू - 'मुंबई दिनांक', 'सिंहासन', 'तडजोड'.
९) वसंत आबाजी डहाके - 'अधोलोक'
१०) अरविंद रे - 'सात पावलं उलटी'.




१) भाऊ पाध्ये - वैतागवाडी, वॅ. अनिरूद्ध धोपेश्वरकर, वॉर्डनं. ७, 'सर्जिकल'.
२) प्रभाकर पेंढारकर - 'अरे संसार संसार'
३) श्री. ना. पेंडसे - 'आकांत', 'हत्या', 'ऑक्टोपस', 'लव्हाळी'.
४) मधु मंगेश कर्णिक - 'वारूळ'
५) जयवंत दळवी - 'आल्बम', 'कहाणी'.
६) अनंत कदम - 'किडे'
७) दिवाकर कांबळी - 'डोकेफूट' 'परळहट'
८) रत्नू दंडवते - 'वसेचिना'
९) मधु सावणे - 'घरदार'
१०) मनोहर शहाणे - 'झाकोळ', 'देवाचा शब्द', 'धाकटे आकाश', 'पुत्र', 'लोभ असावा', 'एखाद्याचा मृ
११) ह. मो. मराठे - 'निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी'




१) जयवंत दळवी - 'चक्र'
२) मधु मंगेश कर्णिक - 'माहिमची खाडी'
३) मनोहर ओक - 'चरसी'
४) - 'धुमसणारे शहर'
५) भाऊ पाध्ये - 'राडा', 'वासूनाका', 'जेलबर्डस', 'करंटा', 'डोंबाऱ्याचा खेळ'
६) शंकरराव खरात - 'हातभट्टी', 'झोपडपट्टी', 'फूटपाथ नं. १'
७) अनंत कदम - दिवसाच्या अंधारात.
८) भाल पाटील - 'उगवतीचे रंग', 'वस्ती वाढते आहे'
९) चंद्रकांत खोत - 'उभयान्वयी अव्यय', 'विसयांतर'.
१०) भानू काळे - 'कॉम्रेड'
११) अरुण साधू - 'झिपऱ्या'
१२) ल. ना. करेकर - 'तो आणि त्याच मुलगा', 'पांढरा सिंह', 'काळी चौकट'.

वरील आलेखावरून महानगरीय वर्गीय स्तरांची क्षेत्रमर्यादा काही कादंबरीकारांना पडलेली दिसते. परंतु या सर्वांच्या एकत्रिकरणातून समग्र महानगरीय वास्तव उभे करण्यास मदत होते. या सर्व वर्गभेदांना छेदून जाण्याचे सामर्थ्य भाऊ पाध्ये वगळता इतर कादंबरीकारांमध्ये अभावानेच आढळते. त्यांच्या ११ पैकी १० कादंबऱ्या 'मुंबई' आणि १ कादंबरी 'दिल्ली' यांच्या कालावकाशात घडताना दिसते. याबाबत राजन गवस म्हणतात, " समग्र महानगर आस्थच्या कवेत आणण्याचा प्रयत्न भाऊ पाध्ये वगळता अन्य लेखकांना तितकासा पेललेला नाही."



अनुक्रमणिका

त्यांच्या 'वैतागवाडी'तील पत्रकार नामदेव फौजदार म्हणतो, ''आपण मध्यमवर्गीय माणसं फारच शेळपट आहोत. नुसते बोलतो. कृती कोणीही करत नाही'', श्री. ना. पेंडश्यांच्या 'लव्हाळी'तील नायक, ह. मो. मराठेंच्या 'निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी'चा नायक हे देखील याचपद्धतीने भाषिक फटकारे ओढीत-ओढीत मध्यमवर्गीय मानसिकतेवर नेमके बोट ठेवतात. महानगरीय कादंबरीचा कणा असलेला 'मध्यमवर्ग' आत्मपीडनासह मांडण्याचे धाडस या आधुनिक कादंबरीकारांनी केले. त्यामुळे महानगरीय कादंबरीला पारंपरिक जोखडातून मुक्त करण्याचे श्रेय निश्चितच भाऊ पाध्यांना जाते.

एवढेच नव्हे तर झोपडपट्टीत राहणाऱ्या बकालतेचे चित्रण धाडसाने करण्याचा पायंडादेखील भाऊ पाध्यांनीच पाडला. त्यांच्या 'वासूनाका', ढसाळांच्या 'गोलपिठा'ने सामान्यांहून सामान्य व जगावरून ओवाळून टाकलेले हे विश्व ताकदीने साहित्यातून उभे केले. प्रस्थापित साहित्यसंकेतांना धक्का देण्याचे कार्य या द्वयींनी केले. लब्धप्रतिष्ठांच्या दृष्टीने टाकाऊ-ओंगळवाणे-गलिच्छ जग पाध्यांनी कादंबरीतून टिकाऊ बनविले. म्हणूनच दि. पु. चित्रे म्हणतात, ''आणखी तीन-चार हजार वर्षांनी मुंबईचे कोणतेही अवशेष न सापडता फक्त भाऊंची पुस्तकं मिळाली तर हे शहर आता आहे तसं डोळ्यांसमोर आणता येईल.''

महानगरातील उच्चभ्रूंच्या चंगळवादावर, अगदी बायकांची अदलाबदल करण्यापर्यंतच्या अनैतिक कृतींवर भाष्य करणाऱ्या; भाऊ पाध्ये 'वणवा', सुभाष भेंडे, 'अंधारवाटा', शांता गोखले, 'रिटा वेलिणकर' यासारख्या कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. नव्याने आलेले बहुराष्ट्रीय कंपन्यांचे प्रभाव व त्यातील बारकावे टिपताना ह. मो. मराठे, (सॉफ्टवेअर, मार्केट, इतिवृत्त), संजय जोशी, (नचिकेतचे उपाख्यान), संजीव खांडेकर (अशांत पर्व), यासारख्या कादंबऱ्या लिहिल्या.

या सर्व प्रभावात 'मध्यमवर्गीयां'चे बदलते भान व त्यातील वैगुण्ये नव्या रुपात मांडताना भाऊ पाध्ये, प्रभाकर पेंढारकर, श्री. ना. पेंडसे, मनोहर शहाणे यांनी मोलाची भर टाकली. तर काही कादंबरीकारांनी एखाद-दुसरी कादंबरी लिहून लेखणी थांबवलेली दिसते. हीच परिस्थिती सामान्यांच्या जीवनचित्रणाबाबत पहावयास मिळते.

महानगरी जाणिवेच्या कादंबरी संदर्भात भाष्य करताना दीपक घारे म्हणतात, ''नागरी कादंबरीत व्यक्तीपेक्षा समाजाला अधिक महत्त्व मिळते त्यामुळे त्यातली पात्रे ही प्रातिनिधिक असतात... आजच्या नागरी जीवनात आणि पर्यायाने नागरी कादंबरीत सत्ता आणि संपत्ती या एका केंद्राभोवती सारं जीवन घडत असतं, उद्ध्वस्त होत असतं. प्रचंड वेग आणि पैशासाठी सर्व बाजुंनी होत जाणारा स्वातंत्र्याचा संकोच हे या नागरी व्यवस्थेचे विशेष आहेत... आजच्या नागरी शोकांतिकांचे मूळ या विकारवशतेलाही राबवणाऱ्या अर्थव्यवस्थेचे आहे. मुळातच सामान्य माणसांना न पेलणारी स्वप्नं निर्माण करणं; आणि त्या स्वप्नांच्या मागे लागल्यावर जादा उत्पादन, जादा श्रम, जास्त पैसा यामध्ये माणसाचं माणूसपण हरवणं. ही अर्थव्यवस्थेची कटू फळं आहेत. नागरी कादंबरी यातून येणाऱ्या विफलतेचं प्रत्ययकारी चित्रण करते.''

❖❖❖

**प्रा. संजय पांडुरंग नगरकर**
(एम. ए. एम.फिल.सेट)
मराठी विभाग प्रमुख, रयत शिक्षण संस्थेचे
राधाबाई काळे महिला महाविद्यालय, अहमदनगर.
भ्रमणभाष : ९४२१२३०७६३







अनुक्रमणिका

ललिता गादगे यांचा कथासंग्रह

# ग्रामीण साहित्यातील फुलं

डॉ. प्रतिमा इंगोले

ललिता गादगे ह्यांचा 'प्राजक्ताची फुलं आणि दाह' हा कथासंग्रह ग्रामीण साहित्यात 'फुलं फुलवून' ह्या साहित्याचा दरवळ सर्वत्र पसरविणारा महत्त्वाचा संग्रह आहे. हा त्यांचा तिसरा संग्रह.

त्यांचे ग्रामीण विश्व मुखरित करणारे आहेत. त्यांच्या कथांची पार्श्वभूमी ग्रामीण आहे. भलेही मग पात्र सुशिक्षित अथवा उच्च शिक्षित असोत. 'दुःख आणि अश्रू' नावाची कथा ह्याचा प्रत्यय देते.

ललिता गादगे ह्यांच्या, स्मरणात राहणाऱ्या कितीतरी कथा आहेत. देह, कोळीष्टकं, बळी, चिमणींचं पिलू, पाठलाग, सोडवणूक सारख्या कथा आवर्जुन नोंद घ्यावीत अशाच. पण आता 'प्राजक्ताची फुलं आणि दाह' ह्या तिसऱ्या कथासंग्रहाचाच इथे प्रामुख्याने विचार करायचा असल्यामुळेच त्यातील कथांचाच परामर्ष घेतला आहे. स्त्रीच्या आदिम दुःखाचा वेध घेण्याचा प्रयत्न, इथे त्या करताना दिसतात. ह्या कथा केवळ स्त्रियांच्याच वेदना सांगत नाहीत तर; जातीयवादाच्या गाळात रूतून बसलेल्या निरपराध लोकांच्या मरणकळाही सांगून जातात. पुरुषप्रधान संस्कृती फोफावली; आणि त्यातूनच विषमता जन्माला आली. स्त्री कनिष्ट. तसेच काही पुरुष, विशेषतः एतद्देशीय, तेही कनिष्ठच.

'प्राजक्ताची फुलं आणि दाह'मध्ये एकूण आठ कथा आहेत. पहिली 'धर्म' कथा शोभाचा आत्महत्येपर्यंतचा प्रवास चित्रित करते. ह्या कथेचे 'धर्म' हे शीर्षक आपणास विचार करण्यास भाग पाडते. धर्मामुळे बनलेली माणसाची मतं, त्यातील तकलादूपणा, व्रतवैकल्यातील फोलपणा, पुरुषाच्या मनातील अहंगंड. त्यामुळे शोभाची होणारी होरपळ. जिव्हाळ्यासाठी आसुसलेला आणि त्यासाठी तगमगत असणारा तिचा जीव. नवऱ्याचा असह्य अत्याचार. त्यातून निर्माण झालेला त्रागा आणि तिरस्कार. मुलगा पप्पू तिचा जीव की प्राण. त्याकडे होणारं दुर्लक्ष. आत्याघरी भाची देऊन वडिलांनी शोधलेली पळवाट. तर आत्याने आपल्या व्यसनी मुलाच्या भल्यासाठी घातलेला लग्नाचा घाट. ह्या सर्वांचे अतिशय सूक्ष्म वर्णन ललिता गादगे ह्यांनी केले आहे. शोभाचा मृत्यू काळजाला घरं पाडणारा आहे. स्त्रीची धर्मामुळे होणारी घुसमट. स्त्रीत्वाचा विचित्र धर्म. सुटकेचा मार्ग न गवसल्याने होणारी कासाविशी. ह्याचे नितांत सुंदर वर्णन ह्या कथेत आहे. शोभाचं आतून, दबून गरजत असणारं आभाळ ! साक्षात् उभं करणारी ही कथा.

दुसऱ्या, 'घालमेल' कथेत मुस्लिम आणि हिंदूंचा संघर्ष. त्यातून उफाळणारा हिंसाचार. त्यात निरपराध मुलांचा व स्त्रियांचा जाणारा बळी. मुस्लिमांमध्येही जिवंत असणारी माणुसकी. हिंदू मुस्लिमांमधील मैत्रीभाव ह्या सर्वांचे मनोवेधक चित्र आले आहे. नामदेव आणि युसूफ ह्यांच्या मैत्रीचं नितांतसुंदर दर्शन या कथेतून घडते. मानवतेच्या आड धर्माने खरे तर येऊ नये. पण एरव्ही तसेच घडते. म्हणूनच ही कथा धर्मापेक्षा मानव मोठा हे सांगून जाते.

'प्राजक्ताची फुलं आणि दाह' ही कथा तर वाचतानाच जिवाचा थरकांप करणारी कथा आहे. उषाचा मरणदायी प्रवास. तिचं सालीसारखं ओरवडणं. तिच्या तनामनाच्या असह्य वेदना आणि त्यात असणारं तिचं गर्भारपण. हे सर्व असह्य झाल्यावर सुरू झालेला आत्महत्येचा प्रवास. आणि त्यातून वाट्याला आलेला भोगवटा. ह्या सर्वांचं फार हृदयस्पर्शी चित्रण प्रस्तुत कथेत आहे.

'निर्णय' कथा अशीच नवऱ्याच्या संशयीपणाला आणि निर्मम वागण्याला कंटाळून लेकीसह घर सोडून जाण्याचा निर्णय घेणारी सुधा आणि आपल्याला कधीही न बोलाविण्याचा सल्ला देऊन पहाटेलाच तो घट्टपणे अंमलात आणणारी ती एक वेगळी नायिका. मातृत्व हा स्त्री जीवनातील नितांत सुंदर क्षण. सृजनाच्या ह्या चिरंतन वेदन-निवेदनामुळे इतर वेदना स्त्रीला कस्पटासमान वाटतात. म्हणूनच मातृत्वाचा अपमान ती सहन करू शकत नाही.

पाचवी 'ऊन'कथा ग्रामजीवनातलं दारिद्र्य आणि त्यामुळे होणारी वाताहात स्पष्ट करते. पैशांसाठी करपणारं बालपण आणि शहरातील स्वार्थी निबरपणा प्रामुख्याने मांडते. एकीकडे नागरी जीवनात चंगळवाद फोफावतो आहे तर दुसरीकडे ग्रामजीवनात शेजारच्या घरून 'भाकरी'





अनुक्रमणिका

वर विस्तव आणून चूल पेटवावी लागते आहे. श्रीमंती आणि गरीबी एकत्र नांदणाऱ्या ह्या देशाचे भेदक वास्तव ह्या कथेतून समोर येते.

तर सहावी कथा 'शिरस्ता' माहेरपणाचा शिरस्ता 'माय' गेली त्याचवर्षी मोडणाऱ्या आपमतलबी भावाची. आजारानं टोक्कर झालेल्या बहिणीला धड शब्दानंही आसरा देऊ न शहकणाऱ्या भावाची आणि त्याच्या नणंद येऊ नये म्हणून, परगावी गेलेल्या बायकोची कथा. सासरचे टालेटुले ऐकून घेत माहेरी डोळे लावून बसणाऱ्या आणि आता केवळ मरणानेच सुटका होण्याचीच शक्यता दिसणाऱ्या असहाय्य बहिणीची ही कथा वाचून माझ्या 'राशाटेक'च्या कथानकाची आठवण झाली. अर्थातच ती कादंवरी आहे. पण आशयसूत्र तेच. आपलं माहेरपण हवंसं वाटणाऱ्या स्त्रिया आपल्या सारख्याच दुसऱ्या स्त्रीचं माहेरपण करायला का कचरत असतील कुणास ठाऊक ! पण हेही चालत आलंय पिढ्यान्‌पिढ्यांपासून ! स्त्रीनंच स्त्रीला समजून घ्यावं म्हणून पुरुष ठपका मारताहेत. कसा वाढावा स्त्रीसमभाव ? वाढेल हळूहळू. पण 'शिरस्ता' कथा शिरस्ता मोडणारी, मनात रूतून बसणारी.

सातवी 'पंख' कथा वाढीव पंख मिळाले म्हणून गुदमरणारी नायिका आणि तिचे सामान्य कुटुंबीय ह्याची कथा. आजच्या झेपावू बघणाऱ्या प्रत्येकच स्त्रीची कथा. झेपावण्याच्या आड येणाऱ्या सर्वांनाच टाळणे तिला जमत नाही. मग सुरू होतो नायिकेचा एकटीचा असहाय प्रवास. तीच ती कुतरओढ. आजच्या स्त्रीचं प्राक्तन.

शेवटची 'लुक अ बिट हायर' कथाही पुन्हा जिल्हाधिकारी झालेल्या सामान्य रूप असणाऱ्या, प्रेमभंग झालेल्या तरीही त्याला खेळीमेळीने सामोरी जाणाऱ्या नायिकेची कथा. खऱ्या अर्थाने आजच्या स्त्रीची कथा ! कितीही कर्तृत्ववान्‌ असली तरी संसार व मूल ह्यात अडकवणाऱ्या समाजाची स्त्रीबद्दलची विचारसरणी आणि त्यातून स्त्रीला करावी लागणारी कसरत ह्यांची कथा.

थोडक्यात 'प्राजक्ताची फुलं आणि दाह' कथासंग्रहात सर्वच नायिका प्राजक्ताची फुलं मिळविण्यासाठी आसुललेल्या. अर्थातच ही फुलं भावनांची, सुखाची, सहजीवनाची, तृप्तीची, यशाची, प्रतिष्ठेची, जिव्हाळ्याची, हक्काची, मायेची, हर्षाची आणखी कशाकशाची. पण ती न मिळता दाह नशिबी आलेल्या आणि त्याची धग सोसत जगणाऱ्या नायिकांची कहाणी सांगणाऱ्या कथा आहेत. त्यातील 'घालमेल' आणि 'ऊन' कथा सोडल्या तर बाकी सर्वच कथा ह्या नायिकांच्या कथा आहेत. म्हणूनच अर्पणपत्रिकेत 'या कथांमधील व्यथा जगणाऱ्या सर्व बहिणींना...' असे त्या आवर्जून म्हणतात. ह्या कथा प्रामुख्याने स्त्री व्यथा मुखरित करणाऱ्या कथा आहेत. स्त्रीच्या नजरेत, खोलवर दडलेल्या उदास स्त्रोताचा जाहीरनामा, ह्या संग्रहातून मांडलेला दिसतो. स्त्रीचं जगणं, दबणं, सोसणं आणि आतल्या आत चरफडणं त्यातून स्पष्ट जाणवते.

तरीही ह्या संग्रहाला ग्रामीण कथासंग्रह मात्र म्हणावेसे वाटत नाही. तो स्त्रीवादी होऊ शकेल. पण ह्यातील 'शिरस्ता' आणि 'ऊन' ह्या दोनच कथा खऱ्या अर्थाने ग्रामीण वाटतात. एरव्ही, वाकीच्या सुशिक्षित स्त्रीच्या कथा वाटतात. पण ललिता गादगे ग्रामीण कथा मात्र ताकदीने लिहू शकतात. त्यांच्या कथा स्त्रीव्यक्तित्वाच्या खोल डोहातील आर्त हाकेला प्रातिनिधिक स्वरूप देणाऱ्या कथा वाटत राहतात. जगण्याच्या आदिम तत्त्वज्ञानावर प्रखर प्रकाश टाकीत स्त्रीच्या वेदनेचा प्रवास त्या मांडत राहतात. म्हणूनच महत्त्वाच्या लेखिका ठरतात.

❖❖❖

**डॉ. प्रतिमा इंगोले,** दर्यापूर
**प्राजक्ताची फुलं आणि दाह**

---

## देणगीदार – १ सप्टेंबर ते ३० नोव्हेंबर २००८

| क्र. | दिनांक | नाव | रक्कम | |
|---|---|---|---|---|
| १) | ११-१०-२००८ | श्री. विजय प्र. पाध्ये | १०,०००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| २) | २६-११-२००८ | श्री. एस. चंद्रशेखर | ५००/- | ग्रंथालयासाठी देणगी |

❖❖❖



अनुक्रमणिका

## निवडक नवे...

प्रा. मिलिंद जोशी

परिषदेकडे आलेल्या ग्रंथांपैकी
विशेष उल्लेखनिय ग्रंथांचा
परिचय करून देणारे सदर




**नोबेल ललना :**

दानशूर शास्त्रज्ञ सर आल्फ्रेड नोबेल यांच्या नावे भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र, वैद्यकीय किंवा शरीर विज्ञान शाखेत शोध लावणाऱ्या व्यक्तींना, तसेच अलौकिक माहित्यकृतीतून आदर्शवाद जोपासणाऱ्या साहित्यकृतीतून आदर्शवाद जोपासणाऱ्या साहित्यिकाला आणि जागतिक पातळीवर शांतता प्रस्थापित व्हावी यासाठी प्रयत्न करणाऱ्या व्यक्तीला 'नोबेल पुरस्कार'देण्यात येतो. मीरा सिरसमकर यांनी 'नोबेल ललना' या पुस्तकात नोबेल पुरस्कार मिळविणाऱ्या विविध क्षेत्रातील चौतीस महिलांच्या कर्तृत्वाची गाथा समर्पक शब्दात मांडली आहे. अनेक दुर्मिळ छायाचित्रे हे ग्रंथांचेच खास वैशिष्ट्य. विविध क्षेत्रात संशोधन करताना त्या ललनांना आलेले विलक्षण अनुभव, त्यांच्या शोधांची माहिती या ग्रंथात वाचायला मिळते. नोबेल पुरस्कार विजेत्या स्त्रियांची माहिती देणारे हे पुस्तक घरोघरी संग्रही असायलाच हवे इतके सुंदर आहे.

(नोबेल ललना - मीरा सिरसमकर - मेहता प्रकाशन - पृष्ठे २२८, किंमत १८०)

**मोठी माणसं :**



'मोठी माणसं' या पुस्तकात भा. र. सावडे यांनी उद्योजकांची कर्तृत्वगाथा मांडली आहे. अनेक उद्योजकांवरोबर प्रत्यक्ष काम करण्याची संधी साबडेंना मिळाली. त्यातून त्यांचा स्नेह जुळला. या संबंधातून उद्योजक आणि त्यांच्यातील माणूसपण, त्यांचेच लोकोत्तर जीवन यांचा वेध या पुस्तकात आहे. जेआरडी टाटा, शंतनुराव किर्लोस्कर, आबासाहेब गरवारे, दामुअण्णा पोतदार, डॉ. नीलकंठ कल्याणी, राहुल बजाज, नवलभाई फिरोदिया, चंद्रकांत किर्लोस्कर, एच. के. फिरोदिया, उदय सिंगराव गायकवाड, वि. म. दांडेकर, बाबुभाई राठी, वि. म. देवल यांची चरित्रे या पुस्तकात वाचायला मिळतात. चरित्रवनातील ही आनंदयात्रा उद्योजकांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू उलगडून दाखविणारी आहे.

(मोठी माणसं - भा. र. सावडे, रसिक आंतरभारती, पृष्ठे २६५, किंमत - रु. २००/-)




**एकपात्री प्रयोग - स्वरूप आणि कलारूप :**

एकपात्री प्रयोगांना दिवसेंदिवस लोकप्रियता आणि लोकमान्यता लाभते आहे. एकपात्रीच्या साहित्यशास्त्राचा आणि एकपात्री कलाकारांच्या अनुभवावर आधारित असा सलग, एकत्रितपणे अभ्यास झालेला नाही. तो करून डॉ. मधुरा कोरान्ने यांनी 'एकपात्री प्रयोग : स्वरूप आणि कलारूप' हे पुस्तक सिद्ध केले आहे. एकपात्री प्रयोगाची पूर्वरूपे, एकपात्रीची व्युत्पत्ती, प्रयोगाचे स्वरूप, प्रेरणा, आस्वाद, सादरीकरण, व्याप्ती आणि

वर्गीकरण, 'एकपात्री प्रयोगाचे स्वरूप - काल आणि आज' अशा अनेक महत्त्वपूर्ण विषयांची सखोल चर्चा या पुस्तकात आहे. एकोणतीस एकपात्री कलाकारांचे अनुभवकथन या पुस्तकात समाविष्ट आहे.

(एकपात्री प्रयोग : स्वरुप आणि कलारुप - डॉ. मधुरा कोरान्ने - स्नेहवर्धन प्रकाशन - पृष्ठे १४८, किंमत १३० रु.)

**श्रीचक्रपाणी चरित्र आणि गीतामृत :**




महानुभव संप्रदायात श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेय, श्रीचक्रपाणी, श्री. गोविंद प्रभू आणि श्रीचक्रधर हे पंचकृष्ण अवतार प्रसिद्ध आहेत. त्यापैकी श्रीचक्रपाणी क्रमाने तिसरे आहेत. चक्रपाणी चरित्र हा प्राचीन मराठी गद्य चरित्रग्रंथ आहे. सातशे वर्षांपूर्वी तो लिहिला गेला. श्रीचक्रपाणी चरित्राचे सर्वांगीण विवरण विस्तृत प्रस्तावनेतून पहिल्यांदाच प्रसिद्ध होत आहे. त्याचे सारे श्रेय महानुभाव साहित्याचे आहे. अभ्यासक डॉ. कन्हैया कुंदप यांना द्यावे लागेल. त्यांनी श्रीचक्रपाणी चरित्र मूळसंहिता, विस्तृत प्रस्तावना आणि टीपा यासह समृद्ध केले आहे. प्राचीन मराठी गद्य चरित्राचे अनोखे दर्शन घडविणारा हा छोटेखानी ग्रंथ अभ्यासकांना उपयुक्त ठरेल असाच आहे. श्रीगीतामृत या पुस्तकात डॉ. कन्हैय्या कुंदप यांनी गीतेतल्या सहाव्या अध्यायावर म्हणजे 'आत्मसंयम योगावर' केलेले आपले चिंतन मांडले आहे. आत्मसंयम योगासारखा क्लिष्ट विषय डॉ. कुंदप यांनी सामान्यांना समजेल इतक्या सोप्यापद्धतीने समजावून सांगितला आहे.

(श्रीचक्रपाणी चरित्र आणि गीतामृत- लेखक डॉ. कन्हैया कुंदप - पृष्ठे ७६, स्वागत मूल्य प्रत्येकी ५० रु.)

**इच्छामरण :**




आनंद पाटील यांची 'इच्छा मरण' ही कादंबरी खूप वेगळी आहे. या कादंबरीचे कथानक शतायुषी अडाणी आजीच्या अटी व इच्छेनुसार प्रत्यक्ष घडलेल्या तिच्या मरण साहेळ्याशी संबंधित आहे. या निमित्ताने त्या गावाचे तिथल्या सांस्कृतिक बदलांचे वेगळ्या शैलीत आनंद पाटील यांनी चित्रण केले आहे. नव्या तंत्राने कादंबरीचे बीज लेखकाने फुलविले आहे. अनेक दिवसांनी आलेली उत्तम ग्रामीण कादंबरी म्हणून तिचा उल्लेख करावा लागेल.

(इच्छामरण - आनंद पाटील, पृष्ठे ३११, किंमत २५० रु. साकेत प्रकाशन.)

**स्वस्तिकाची पावले :**




'स्वस्तिकाची पावले' हा कवी दत्ता हलसगीकर यांचा ललितलेखसंग्रह आहे. संवेदनशील मनाच्या कवीला अवतीभोवती जे दिसते ते त्यांनी ललितलेखांच्या माध्यमातून सांगितले आहे. फुलपाखराच्या जन्मापासून ते आजच्या दहशत वादापर्यंतचे अनेक विषय या लेखनात आले आहेत. हलसगीकरांच्या कवितांइतकेच हे ललितलेखन भावणारे आहे. ही 'स्वस्तिकाची पावले' मांगल्याला आवाहन करणारी आहेत. अंधाराच्या नावाने बोटे मोडत बसण्यापेक्षा प्रकाशकिरण कसे निर्माण करावेत असा आशावाद जागविणारे हे लेखन आहे.

(स्वस्तिकाची पावले - दत्ता हलसगीकर - सुविद्या प्रकाशन - पृष्ठे ११४, किंमत ११० रु.)

**साखरफेरा :**

साखरफेरा ही मोहन पाटील यांची कादंबरी ऊस उत्पादक शेतकऱ्यांच्या व्यथाकथा मांडणारी आहे. साखर कारखाने,




तिथले राजकारण, याचे चित्रण या कादंबरीत घडते. सपाट शेतकऱ्यातील अफाट झुंजारवृत्तीला लेखकाने ही कादंबरी अर्पण केलेली आहे. ऊस उत्पादक शेतकऱ्यांच्या व्यथा मांडताना त्यांच्या वृत्तीमध्ये होत जाणारा बदल समर्पकपणे लेखकाने या कादंबरी मांडला आहे. 'प्रस्थापित सहकाराच्या आवश्यकतेसह जागतिकीकरणाच्या नव्या जाणिवांना न्याय देणारी आणि गांधी-मार्क्समिश्रित नव्या मार्गाचे सूचन भेदरेषेसह स्पष्ट करणारी वेगळी कादंबरी' अशा शब्दात जी. के. ऐनापुरे यांनी कादंबरीचा गौरव केला आहे.

(साखरफेरा - मोहन पाटील - कॉन्टिनेन्टल प्रकाशन - पृष्ठे २३१ किंमत १५० रु.)

**पालवी**




पालवी ही निराधार मुलांसाठी काम करणाऱ्या संस्थांची माहिती देणारी पुस्तिका आहे. निराधार मुलांसाठी अनेक सामाजिक संस्था कार्यरत आहेत. या संस्थांची, संस्थापकांची माहिती देण्याबरोबरच एकूणच मुलांशी संबंधित प्रश्नांची चर्चा 'पालवी'मध्ये आहे. केवळ बघ्याची भूमिका न घेता समाजाने आपले योगदान यावे अशी या पुस्तकाच्या निर्मितीमागची लेखकाची भूमिका आहे. या पुस्तकाचे संपादन श्रीराम ओक यांनी केले आहे.

(पालवी - संपादन श्रीराम ओक, प्रकाशक - आपण सारे, पुणे विद्यार्थीगृहाचे माजी विद्यार्थी, पृष्ठे १०८, स्वागत मूल्य - ५० रु.)




**मोहनमाया :**

'मोहनमाया : गांधी आणि त्यांचा मित्रपरिवार' या ग्रंथात रामदास भटकळ यांनी मोहनदास गांधी ते महात्मा गांधी, गांधींच्या व्यक्तिमत्त्वातील माणूस ते महात्मा अशा परिवर्तनाची एक शोधप्रक्रिया मांडली आहे. मोहनदास करमचंद, बॅरिस्टर गांधी, गांधीभाई, सत्याग्रही बापू अशा वेगवेगळ्या टप्प्यावर जी मित्रमंडळी गांधीजींना भेटली. त्या मित्रपरिवाराचा आणि त्यांच्या स्नेहाचा गांधींच्या व्यक्तिमत्त्वावरती प्रभाव पडत होता. हे सूत्र पकडून एक लेखक म्हणून गांधींकडे अलिप्तपणे, त्रयस्थपणे पाहत रामदास भटकळ यांनी हे लेखन केले आहे. गांधीजी समजून घेण्यासाठी हे पुस्तक उपयुक्त आहे. असे सूत्र पकडून गांधींच्या संदर्भातल्या लेखनाचे हे पहिलेच पुस्तक असावे. अभ्यासू वाचक या ग्रंथांचे निश्चितच स्वागत करतील.

(मोहनमाया - रामदास भटकळ - मौज प्रकाशन, पृष्ठे ३१०, किंमत २५० रु.)

**पंतप्रधानांना पत्र :**




'पंतप्रधानांना पत्र' हा अरुण शेवते यांचा दहावा कवितासंग्रह आहे. शेतकऱ्यांना श्रद्धांजली, पंतप्रधानांना पत्र आणि कारभाऱ्यांना पत्र अशा तीन शीर्षकाखाली शेवते यांनी लिहिलेल्या कविता अस्वस्थ करणारे वास्तव मांडणाऱ्या आहेत. अन्नदात्या शेतकऱ्यावर भीक मागण्याची वेळ येते. गोरे गेले आणि काळे आले. पक्ष बदलले पण मानसिकता बदलली नाही. लालफितीने नकारघंटाच वाजवली. पांढरपेशांनी कोषात जगणेच पसंत केले. या पार्श्वभूमीवर शेतकऱ्यांच्या व्यथेचं गाणं अरुण शेवतेंनी या कवितासंग्रहात मांडले आहे.

(पंतप्रधानांना पत्र - अरुण शेवते, ग्रंथाली प्रकाशन - पृष्ठे ८४, किंमत ८० रु.)





अनुक्रमणिका




**प्रस्तावना : स्वरूप आणि संकल्पना :**

'प्रस्तावना : स्वरूप आणि संकल्पना' हे डॉ. अनिल सहस्रबुद्धे यांचे पुस्तक वाङ्मयनिर्मिती विषयी अभ्यास करणाऱ्या अभ्यासकांना उपयुक्त ठरेल असेच आहे. प्रस्तावना हे ग्रंथाचे प्रवेशद्वार असते. मान्यवरांची प्रस्तावना हे ग्रंथाचे वैभव असते. या प्रस्तावनेचे ग्रंथव्यवहारातील महत्त्व, तिचे स्वरूप, संकल्पना व आवश्यकता या मान्यांची अभ्यासपूर्ण चर्चा या पुस्तकात आहे. स्वतः लेखकाने लिहिलेल्या काही पुस्तकांच्या प्रस्तावनाही वानगीदाखल या पुस्तकात दिल्या आहेत. प्रस्तावना आणि समीक्षा, प्रस्तावना लेखकाने पाळावयाची पथ्ये, प्रस्तावना लेखनातील अडचणी यासंदर्भातले लेखकाचे चिंतन महत्त्वाचे आहे.

(प्रस्तावना : स्वरूप आणि संकल्पना - डॉ. अनिल सहस्रबुद्धे, पद्मगंधा प्रकाशन, पृष्ठे ९४. किंमत ८० रु.)

❖❖❖

प्रा. मिलिंद जोशी
बी१-१२, रविराज टेरेस, सुखसागरनगर, कात्रज, पुणे ४११ ०४६.
दूरभाष : (०२०) २६९६३५०९, ९८५०२७०८२३

# नवे आजीव सभासद

१) गावित माहेश्वरी वीरसिंग, अ. नगर
२) मालुंजकर मच्छिंद्र केरूजी, अ.नगर
३) कुलकर्णी अरुण केशव, पुणे.
४) बापट अविनाश विनायक, हिंदल
५) वरे विलास रघुनाथ, लोणंद
६) आगाशे गोविंद श्रीराम, पुणे
७) कोठुळे मदन मोहन, पुणे
८) कुमकर मिनाक्षी श्रीकांत, पुणे
९) कुमकर श्रीकांत गुलाबराव, पुणे
१०) जोशी शची बाजीराव, मोहोळ
११) आचार्य स्वाती, पुणे
१२) गाडगीळ सदानंद रामचंद्र, पुणे
१३) जगताप शिवाजी दिगंबर, चिंचवड
१४) जगताप भारती शिवाजी, चिंचवड
१५) शिंदे धीरज अर्जुनराव, चिंचवड
१६) शिंदे अंजली धीरज, चिंचवड
१७) किणयेकर प्रकाश सोनापा (बेलगुंद)
१८) कडेकर वसंतराव (विश्रामबाग)
१९) पारखी सुभाष विनायक, पुणे
२०) तोरे पृथ्वीराज भास्करराव, नांदेड
२१) तांदळे शरद उत्तमराव, पुणे
२२) डिवरे वृषाली प्रकाशराव, पुणे
२३) जोशी नीलकंठ चिंतामणी, पुणे
२४) जोशी मंदाकिनी नीलकंठ, पुणे
२५) अभ्यंकर देवेश नारायण, पुणे
२६) अभ्यंकर देवयानी देवेश, पुणे
२७) वेताळ मुकुंद विठ्ठल, पुणे
२८) मिरासदार प्रसाद अनंत, पुणे
२९) घोरपडे राहुल चंद्रकांत, पुणे
३०) डोणजेकर हेमलता शरदचंद्र, पुणे
३१) दामले अनंत मुकुंद, पुणे
३२) कर्णिक माणिक मुकुंद, पुणे
३३) कुमठेकर शीला हरि, पुणे
३४) मारुलकर सुलोचना दत्तात्रय, पुणे
३५) जमादार हुसेन साहेब, कोल्हापूर
३६) मंकणी सुनेत्रा रविंद्र, पुणे
३७) सोमण सुजाता सदानंद, पुणे
३८) घालुंगडे आनंद शंकर, चिंचवड
३९) जोशी मधुरा प्रसाद, पुणे
४०) शिर्दोड आरती, पुणे
४१) शिर्दोड सुरेश, पुणे
४२) मोघे निकीता निर्तीन, पुणे
४३) नेने मंजुषा मधुसूदन, वाई
४४) अभ्यंकर भास्कर प्रभाकर, वाई
४५) अभ्यंकर रजनी भास्कर, वाई
४६) कुलकर्णी नरहरी अनंत, सातारा
४७) कोल्हटकर सुरेश दत्तात्रय, पुणे
४८) कोल्हटकर सुप्रिया सुरेश, पुणे
४९) पाठक प्रसाद मुकुंद, पुणे
५०) कुलकर्णी शंकर उर्फ विनोद विठ्ठल, पुणे
५१) मोडक प्रतिभा शाहू, पुणे
५२) केले उज्ज्वल रघुनाथ, पुणे
५३) लोखंडे श्रीनिवास अनंत, पुणे
५४) चव्हाण भारती सुभाष, पुणे
५५) गायकवाड देविदास रावजी, वारणानगर
५६) कुलकर्णी रमेश पांडुरंग, कोल्हापूर
५७) कुलकर्णी रुपाली रमेश, कोल्हापूर
५८) कुलकर्णी रामचंद्र बाळकृष्ण, कराड
५९) नाईक बाळासाहेब दयाराम, पुणे
६०) वैद्य मधुर संजीव, पुणे
६१) काळे मोहन बाबुराव, कराड
६२) शेख नसीर बागाजी, अ.नगर
६३) चावर पाटील अशोक पांडुरंग, पुणे
६४) देशमुख प्रतापराव आण्णासो., नरंद
६५) आंबेकर मीना सदाशिव, पुणे
६६) ताकमोगे रमेश वामन, शिरापूर
६७) पाटसकर दिप्ती ज्ञानेश्वर, पुणे
६८) वाघमारे संजय जगन्नाथ, बेंडग
६९) चिपळूणकर यशवंत मोरेश्वर, पुणे
७०) भोसले भाऊसो. सर्जेराव, आलेगाव पागा
७१) मुळे लवकुमार वल्भीम, गंगाव-जत
७२) कुंभार अशोक वल्भीम, पुणे
७३) कुलकर्णी श्रीराम विठ्ठल, पुणे
७४) मुळे विजय विद्याधर, निगडी
७५) मुळे वैशाली विद्याधर, निगडी
७६) घाटे गीतांजली मुकुल, पुणे
७७) हरणे मनीष संजय, सोलापूर
७८) पाटील स्मिता प्रमोद, सोलापूर
७९) वाघमारे योगीराज केशव, सोलापूर
८०) गिरी गोसावी संदीप बंडू, शिंदे
८१) चौधरी प्रभात रामभाऊ, जळगाव
८२) महाजन सुभाष देवच, जळगाव
८३) सुतार पांडुरंग कौतीक, पाचोरा
८४) पाटील चित्रा मुकदेव भडगाव
८५) केंद्रे विठ्ठल दिगंबर, उदगीर
८६) रोकडे भानुदास रतिलल, पुणे
८७) वाघ मेनका संजय, उरळीकांचन
८८) इनामदार किशोर दिगंबर, पुणे
८९) मेहेंदळे निवेदिता नचिकेत, पुणे
९०) व्यवहारे नरेंद्र मार्तंड, पुणे
९१) चिंगरे चंद्रशेखर दत्तात्रय, नाशिक
९२) उपासनी नारायण त्र्यंबक, पुणे
९३) दाभोळकर गोविंद मधुसुदन, पुणे
९४) कुलकर्णी उज्ज्वला, पुणे
९५) महागांवकर अंजली, पुणे
९६) फडणीस केशव रामचंद्र, पुणे
९७) कात्रा शामसुंदर रामचंद्र, बार्शी
९८) भराडिया जयप्रकाश राधेशाम, बार्शी
९९) कुलकर्णी अच्युत प्रल्हाद, बार्शी
१००) देशमुख सविता जयंत, बार्शी
१०१) महाजन प्रतिभा पांडुरंग, पुणे
१०२) कांबळे उत्तम मारुती, नाशिक
१०३) ब्राह्मणे अरविंद प्रभाकर, अ.नगर
१०४) बापट उमा विलुभाऊ, मुंबई



# कार्यवृत्त नोंद

(०१ सप्टेंबर ते ३० नोव्हेंबर २००८)

डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह

**२० सप्टेंबर २००८ :**

मराठी साहित्यातील एक बहुआयामी नाव- गंगाधर गाडगीळ यांना श्रद्धांजली.

**२६ सप्टेंबर २००८ :**

प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांच्या षष्ठ्यद्विपूर्ती निमित्त महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे परिषदेचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांच्या अध्यक्षतेखाली शुभेच्छा व सत्कारसमारंभ झाला. या प्रसंगी डॉ. कल्याणी दिवेकर यांनी डॉ. वैद्य यांची हृद्य प्रकट मुलाखत घेतली.

**२७ सप्टेंबर २००८ :**

महाराष्ट्र साहित्य परिषदतर्फे दिला जाणारा 'प्रा. गो. रा. परांजपे स्मृती-पुरस्कार' विख्यात वैज्ञानिक व विज्ञानसाहित्यिक डॉ. जयंत नारळीकर यांना प्रदान करण्यात आला. 'मी वैज्ञानिक कसा झालो' या विषयावर डॉ. नारळीकरांच्या उद्‌बोधक व्याख्यानाचा लाभ उपस्थितांना झाला.

**२ ऑक्टोबर २००८ :**

ज्येष्ठ रंगकर्मी दामू केंकरे यांना विनम्र श्रद्धांजली वाहण्यात आली. या प्रसंगी श्रीकांत मोघे, सुरेशचंद्र पाध्ये, सुनील महाजन, श्रीनिवास भणगे, लालन सारंग, विजय कुवळेकर आणि परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे इ. मान्यवरांनी व्याख्यानरूपाने श्रद्धांजली वाहिली.

**७ ऑक्टोबर २००८ :**

ग्रंथालय विभागातर्फे श्री. अनंतराव जोशी आणि विभागातील कर्मचाऱ्यांनी वाक्‌देवी सरस्वतीच्या पूजनाचा कार्यक्रम केला. यानिमित्ताने ग्रंथालयाच्या आधुनिकीकरणाची आणि अद्ययावत व्यवस्थापनाची माहिती श्री. जोशी यांनी दिली.

**१३ ऑक्टोबर २००८ :**

साहित्यिक डॉ. विद्याधर पुंडलीक पुरस्कार - 'माणूस नावाचं झाड' या व्यक्तिचित्रात्मक पुस्तकाचे लेखक प्रा. वसंत कोकजे यांना डॉ. अनिल अवचट यांच्या हस्ते देण्यात आला.

**१६ ऑक्टोबर २००८ :**

'पूना बुक फेअर' आणि महाराष्ट्र साहित्य परिषद यांनी एकमेकांच्या सहकार्याने ग्रंथ प्रदर्शनाच्या निमित्ताने कथाकथन आणि कवितासादरीकरणाचा कार्यक्रम 'अक्षरांच्या अंगणी' सादर केला. डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, प्रतिमा जोशी, मीरा शिंदे, दीपक करंदीकर प्रभृतींचा यात सहभाग होता. परिषदेच्या कार्यवाह स्वाती महाळंक आणि प्रा. सौ. अरुणा महाळंक यांनी बालकवींच्या कवितांवर आधारित कविता सादरीकरणाचा अनोखा कार्यक्रम सादर केला.

या निमित्तानेच दि. १७ ऑक्टोबर २००८ रोजी क्रीडाचर्चा आयोजित केली. त्यात प्रसिद्ध क्रिकेटपटू चंदू बोर्डे, स्वाती घाटे, शांताराम जाधव यांची प्रकट मुलाखत प्रकाश पायगुडे यांनी घेतली.

**१७ ऑक्टोबर २००८ :**

युवा मंच तर्फे बालकविस्मृतिदिनानिमित्त कविसंमेलन- प्रमुख उपस्थिती : उद्धव कानडे व अंजली कुलकर्णी, सहभाग - कदमबांडे, सीमा डोरले, मंदार खटावकर, नितीन चंदनशिवे, हीना कौसरखान, पूजा बावले, पत्की, जोग.

**२० ऑक्टोबर २००८ :**

कै. महामहोपाध्याय द. वा. पोतदार पुरस्कार, प्रा. पद्माकर प्रभुणे यांना 'महाराष्ट्रातील चलनांचा इतिहास' या ग्रंथलेखनासाठी देण्याचा समारंभ इतिहास अभ्यासक निनाद बेडेकर यांच्या हस्ते व अध्यक्षतेखाली साजरा झाला. या प्रसंगी म. म. पोतदारांच्या स्नुषा श्रीमती शुभलक्ष्मी पोतदार आणि ग्रंथपरीक्षण समितीच्या प्रा. सुहासिनी देशपांडे व महेश तेंडुलकर यांचा सत्कार झाला.

**२० नोव्हेंबर २००८ :**

कवयित्री व गायिका योगिनी जोगळेकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त कवयित्री आसावरी काकडे यांच्या अध्यक्षतेखाली कवयित्री संमेलन आयोजित केले. सहभाग- सुधन्वा जोगळेकर, सुनेत्रा ओक, संजीवनी बोकील, भारती पांडे, स्नेहसुधा कुलकर्णी, प्रतिमा जोशी, अनुराधा काळे, शीलवती निपुंगे, मंजिरी सरदेशमुख, सूत्रसंचालन प्रा. ज्योती जोशी.



अनुक्रमणिका

**२५ नोव्हेंबर २००८ :**

प्रसिद्ध संतचरित्र-कादंबरीकार, कवी, चित्रपटनिर्माते आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेचे माजी प्रमुख कार्यवाह श्री. रवींद्र भट यांच्या दुःखद निधनानंतर परिषदेने शोकसभेचे आयोजन केले. याप्रसंगी डॉ. प्र. चिं. शेजवलकर, कमलाकर वाकणकर, मधू नेने, डॉ. न. म. जोशी, प्रमोद आडकर, श्रीराम रानडे, रतनलाल सोनग्रा, जयंत भिडे, राम घोडके, कोषाध्यक्ष ह. ल. निपुणगे, कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांच्या मनोगतांनंतर परिषदेच्या प्रमुख कार्यवाह यांनी उपस्थितांच्या भावना व्यक्त करणाऱ्या शोकप्रस्तावाचे प्रकट वाचन केले.

**'कॉफी-क्लब' चे सहजसंवाद :**

**दि. १७ सप्टेंबर २००८ :**

प्रसिद्ध स्त्रीरोग चिकित्सक, परिषदेचे सदस्य आणि 'शतायुषी'चे संपादक डॉ. अरविंद संगमनेरकर यांच्याशी गप्पा झाल्या.

**दि. १ ऑक्टोबर २००८ :**

इंदूर (मध्य प्रदेश) येथील कवयित्री शोभा तेलंग यांच्याशी सहजसंवाद झाला.

**१५ ऑक्टोबर २००८ :**

'आईच्या कविता'वर प्रदीप दीक्षित यांच्या प्रमुख सहभागाने गप्पा.

**१९ नोव्हेंबर २००८ :**

परिषदेचे कार्यवाह व तरुण साहित्यिक, वक्ते प्रा. मिलिंद जोशी यांच्याशी, त्यांच्या साहित्यिक वाटचालींबाबतच्या विचारांची ओळख करून घेतली.

कार्याध्यक्ष प्रा. डॉ. वि. भा. देशपांडे, प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य, कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी आणि स्वाती महाळंक, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे यांनी वरील कार्यक्रमात प्रास्ताविक करणे, सूत्रसंचालन करणे, पाहुण्यांचा परिचय करून देणे इ. प्रकारे सहभाग घेतला.

❖❖❖

# शाखा कार्यवृत्त

## पिंपरी-चिंचवड शहर

**दि. १७-८-२००८ :**

**खुली राज्यस्तरीय काव्यस्पर्धा :**

मा. विजय शेवाळे (चेअरमन पुणे मर्चंट को. ऑप. बँक) हे अध्यक्ष होते. मा. महापौर अपर्णाताई डोके या प्रमुख पाहुण्या म्हणून होत्या. तसेच नागनाथ लोहारे, म. भा. चव्हाण, शाखाध्यक्ष संजय खानोलकर, कार्याध्यक्ष गुलाब बिरदवडे, प्रा. उमा चांदोरकर उपस्थित होते. कवयित्री अंजू सोनवणे यांच्या 'सांगायचं राहून गेलं' या चारोळी काव्यसंग्रहाचे प्रकाशन याप्रसंगी झालं. काव्यस्पर्धेत सुमारे ९० कवी सहभागी झाले. डॉ. सौ. रजनी सेठ व दत्तू ठोकळे यांनी काव्यस्पर्धेचे परीक्षक म्हणून काम पाहिले. सूत्रसंचालन कार्यवाह संजय जगताप यांनी केले. संदीप सामाले, भानुदास रोकडे, आदिती कुलकर्णी, ज्योती शिंदे, विजया मानमोडे, उषाकुमारी, जनार्दन धुमाळ, विभीषण पोटरे, पुरुषोत्तम दिमके, वत्रन शेटे, पांडुरंग देसाई, सविता यादव, विभावरी राऊत, किरण खुडे, प्रकाश हगवणे, वामन बोरकर, ज्ञानेश्वर भूमकर हे विविध गटातील यशस्वी स्पर्धक होते.

❖❖❖

## ठाणे जिल्हा शाखा

**दि. १० ऑगस्ट २००८ :**

परिषदेच्या २९व्या वर्धापनदिनानिमित्त 'लेखकाची सुख-दुःखे' या विषयावर सौ. मंगला गोडबोले यांचे व्याख्यान आयोजित केले होते. यावेळी प्रा. वि. चिं. फडके यांच्या 'चेत्रई मेल' या कथासंग्रहाचे प्रकाशन झाले.

**दि. २८ सप्टेंबर २००८ :**

**प्रा. म. वि. फाटक स्मृतिपुष्प :**

प्रा. मीना गुर्जर यांचे 'साहित्यातील नातेसंबंध' या विषयावर व्याख्यान झाले.

## श्रीरामपूर शाखा

**दि. २८ सप्टेंबर २००८ :**

साहित्यिक गंगाधर गाडगीळ यांना श्रद्धांजली वाहण्याच्या निमित्ताने कार्याध्यक्ष प्रा. टी. ई. शेळके यांच्या अध्यक्षतेखाली 'गंगाधर गाडगीळ व्यक्ती व वाङ्मय' यावर चर्चा आयोजित केली होती. पप्र. प्रकाश कुलकर्णी यांनी प्रा. डॉ. बाबुराव उपाध्ये यांच्या 'संत गोरा कुंभार वाङ्मयदर्शन' या विषयावर चर्चा आयोजित केली होती. तसेच श्री. खाडे यांच्या आत्मचरित्रावर चर्चा झाली. सौ. भाग्यश्री बडे, विजय नगरकर, भागवत मुठे, महंत कृष्णराज, चेतन लुळे, सुयश काळे, अंकुल नेरकर, कोठारी यांनी चर्चेत भाग घेतला.



## बार्शी शाखा

**दि. १ जून २००८ :**

नाटककार विजय तेंडुलकर यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**दि. २४ ऑगस्ट २००८ :**

वार्षिक सर्वसाधारण सभा आयोजित करण्यात आली होती.

**दि. १४ ऑक्टोबर २००८ :**

कोजागिरी पौर्णिमेनिमित्त स्नेहमेळावा घेतला. अध्यक्ष श्यामसुंदर मुळे होते. विविध कला आविष्कार सादर करण्यात आले. मुकुंद राज कुलकर्णी, प्रकाश गव्हाणे, पां. न. निपाणीकर व पी. के. देशमुख यांनी त्यात सहभाग घेतला.

## सोलापूर शाखा

**दि. ३ मे २००८ :**

भाई विश्वासराव फाटे मु. मोहोळ, जि. सोलापूर यांच्या निवासस्थानी त्यांच्या नामफलकाचा उद्घाटन समारंभ पत्रकार अरविंद जोशी यांच्या शुभहस्ते आणि मा. नागेश सुरवसे यांच्या अध्यक्षतेखाली पार पडला. प्रास्ताविक प्रा. प्रेमचंद मेने यांनी केले. सौ. शोभना सागर व मारुती कटकधोंड यांनी मनोगत व्यक्त केले. नंदकुमार फाटे यांनी आभार मानले.

**दि. १ जून २००८ :**

दत्ता हलसगीकर यांच्या अध्यक्षतेखाली वार्षिक सर्वसाधारण सभा झाली.

**दि. १३ ऑगस्ट २००८ :**

आचार्य अत्रे जयंतीनिमित्त 'अत्रे आणि मी श्याम' या विषयावर प्रा. माधव वझे यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक- नागेश सुरवसे, स्वागत दत्ता हलसगीकर, परिचय- अरुण धुमाळ, आभार पद्माकर कुलकर्णी, सूत्रसंचालन - बाबुराव मैंदर्गीकर यांनी केले.

**दि. १८ ऑगस्ट २००८ :**

सोलापूर शाखा, महानगरपालिका, बालकुमार साहित्य मंच यांच्यातर्फे 'कै. व्यंकटेश कामतकर मार्ग' या फलकाचे उद्घाटन करण्यात आले. महापौर अरुणा वाकसे, दत्ता हलसगीकर, विजया जहागीरदार, निर्मला ठोकळ, हे मान्यवर उपस्थित होते. सूत्रसंचालन- पद्माकर कुलकर्णी व आभार प्रदर्शन प्रसन्न कामतकर यांनी केले.



## इचलकरंजी शाखा

**दि. २ एप्रिल २००७ :**

बाळ बाबर यांचे काव्य वाचन व कथाकथन असा कार्यक्रम झाला.

**दि. १३ ऑगस्ट २००७ :**

मीरा सहस्त्रबुद्धे कोल्हापूर यांचे कवितावाचन आणि गप्पा असा कार्यक्रम आयोजित केला होता.

**दि. ५ नोव्हेंबर २००७ :**

श्री. र. ह. कुलकर्णी, पुणे यांचे व्याख्यान व कवितावाचन कार्यक्रम झाला. तसेच राज्यस्तरीय काव्य लेखन स्पर्धा आयोजित करण्यात आली होती.

**दि. १० मार्च २००८ :**

प्रा. विठ्ठल वाघ यांचे काव्यवाचन आयोजित करण्यात आले होते. यावेळी राज्यस्तरीय काव्य लेखन स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ पार पडला.

**दि. ४ जून २००८ :**

प्रा. सुनिलकुमार लवाटे यांचे 'साहित्याचे जीवनातील स्थान' या विषयावर व्याख्यान झाले.



अनुक्रमणिका

## जळगाव जिल्हा शाखा - पाचोरा

**दि. १७-९-२००८ :**

प्रा. गंगाधर गाडगीळ यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी मा. प्रा. डॉ. बी. एन्. पाटील यांच्या अध्यक्षतेखाली सभा झाली. प्रा. वासुदेव वले, प्रा. पी. डी. पाटील हे कै. प्रा. गाडगीळ यांच्याविषयी बोलले. अजय अहिरे यांनी सूत्रसंचालन केले व प्रा. सौ. सुनिता मांडोळे यांनी आभार मानले.

**दि. २३ नोव्हेंबर २००८ :**

विभागीय मराठी साहित्य संमेलनाचा सविस्तर वृत्तांत अंकात इतरत्र दिला आहे.

**डॉ. माधवी वैद्य,** प्रमुख कार्यवाह
**शब्दांकन - दीपक करंदीकर**

---

# विनम्र श्रद्धांजली !







**रवींद्र भट**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेचे माजी प्रमुख कार्यवाह, संतांचे कादंबरीमय चरित्र लिहिणारे प्रख्यात कादंबरीकार, नाटककार, कवी, चित्रपटकार, नभोनाट्यलेखक, अनुबोधपटकार, इत्यादि बहुआयामी व्यक्तिमत्त्व श्री. रवींद्र भट यांना वयाच्या ६९ वर्षी देवाज्ञा झाली.

इंद्रायणी काठी, सागरा प्राण तळमळला, भेदिले सूर्यमंडळा, भगिरथ, अनादि मी अनंत मी, देवाची पाऊले, घरट्यात मी एकटा, आभाळाचे गाणे, सत्यम् शिवम् सुंदरम्, घास घेई पांडुरंगा, एका जनार्दनी, इत्यादि त्यांच्या कादंबऱ्या रसिकांच्या मनात घर करून आहेत.

चित्रपटनिर्माता म्हणूनही त्यांनी आपली नाममुद्रा चित्रपटक्षेत्रात मोजके आणि पारितोषिकपात्र चित्रपट निर्माण करून कोरली आहे. त्यांच्या 'ते माझे घर' या चित्रपटाला राष्ट्रपतीपदक प्राप्त झाले. पुणे विद्यापीठाचा प्रतिष्ठेचा ना. ह. आपटे स्मृतिपुरस्कार, चेतना ट्रस्ट पुरस्कार, साहित्य परिषद पुरस्कार आणि दर्पण पुरस्कार त्यांना प्राप्त झाले. त्यांचे व्यक्तिमत्त्व आध्यात्मिक होते. सज्जनगडावर राहून त्यांनी समर्थांच्या जीवनावर कादंबरीलेखन केले. सज्जनगडच्या निवासस्थानासाठी त्यांनी भरघोस देणगी दिली आहे.

एक कलंदर व्यक्तिमत्त्व म्हणून ते सर्वांना प्रिय होते. द्रविड हायस्कूल, वाई व एस. पी. कॉलेज, पुणे येथे त्यांचे शिक्षण झाले. १९६८ ते १९८० या काळात आकाशवाणी पुणेवर निवेदक म्हणून त्यांनी कार्य केले.

महाराष्ट्र सरकारच्या आऊट साईड प्रोड्युसर पॅनेलवर ते निर्माता प्रतिनिधी होते. समर्थांच्या जीवनावर एक भव्य चित्रपट निर्मिती करण्याचे व संत कवयित्री मीरा यांच्या जीवनावर कादंबरी लिहिण्याचे त्यांचे स्वप्न अपुरे राहिले.

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली !

संपादक



अनुक्रमणिका

# पाचोरा येथे संपन्न झालेले एकदिवसीय विभागीय मराठी साहित्य संमेलन–वृत्तांत

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पाचोरा शाखेतर्फे रविवार, दिनांक २३ नोव्हेंबर २००८ रोजी एक दिवसीय विभागीय मराठी साहित्य संमेलन अत्यंत उत्साहात पार पडले. पाचोरा शहर आणि आसपासच्या गावातील असंख्य साहित्यप्रेमी रसिकांचा, लेखकांचा, कवींचा, वक्त्यांचा, अभ्यासकांचा उदंड प्रतिसाद आणि सहभाग या संमेलनास लाभला होता.

जळगावचे ज्येष्ठ साहित्यिक, प्राचार्य डॉ. प्रभाकर श्रावण चौधरी हे ह्या संमेलनाचे अध्यक्ष होते. 'अक्षरवैदर्भी'चे संपादक व जनसाहित्य परिषद, अमरावतीचे अध्यक्ष डॉ. सुभाष सावरकर हे संमेलनाचे उद्घाटक होते. तसेच पाचोरा शहराचे नगराध्यक्ष मा. भाऊसाहेब दिलीप वाघ हे संमेलनाचे स्वागताध्यक्ष होते. निमंत्रक समितीचे अध्यक्ष म्हणून प्राचार्य डॉ. बी. एन्. पाटील यांनी जबाबदारी सांभाळली होती. तर या विभागीय साहित्य संमेलनाला- मराठी बोली साहित्य संघ, जळगांव जिल्हा, म.सा.प. शाखा जळगांव व धुळे साहित्य साधना संघ, पाचोरा, श्रीसमर्थ सेवा संघ, पाचोरा, श्रेयस परिवार, पाचोरा, एम्.एस्. कॉलेज, पाचोरा, जळगांव जिल्हा साहित्यसंघ व उत्तर महाराष्ट्र साहित्य परिषद, मराठी बोली साहित्य संघ जळगांव जिल्हा इत्यादी संस्थांचे सहकार्य लाभले होते. संमेलनाचे आयोजन सल्लागार समितीचे प्रमुख राजन मुठाणे व त्यांचे सहकारी डॉ. किसन पाटील, प्रभाकर संत, पुरुषोत्तम काळे, पद्माकर कुलकर्णी, प्रतिभा लिमये यांनी काम पाहिले.

पाचोरा शहरातील भडगांव रस्त्यावरील एम्.एस्. कॉलेजच्या प्रांगणात उभारलेल्या शोभिवंत मंडपात हे एक दिवसीय साहित्य संमेलन दिमाखात पार पडले. या परिसराला 'साने गुरुजीनगर' असे सुयोग्य नाव देण्यात आले होते.

पाचोरा शहरातील छ. शिवाजी महाराज चौक ते संमेलनस्थळ अशी भव्य ग्रंथदिंडी या निमित्ताने काढण्यात आली होती. पाचोऱ्यातील सर्व शाळा व महाविद्यालयातील विद्यार्थी विद्यार्थिनींचा ग्रंथदिंडीत उत्साही सहभाग होता. त्यामुळे शहरात वातावरण निर्मिती झाली. ग्रंथदिंडीचे आगमन सकाळी साडे नऊच्या सुमारास 'साने गुरुजीनगर' येथे संमेलनस्थळी झाले. म.सा.प.चे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे व त्यांचे सहकारी आणि इतर मान्यवरांनी त्यात प्रामुख्याने प्रा. चौधरी, डॉ. सावरकर, मा. भाऊसाहेब वाघ होते, यांनी ग्रंथदिंडीचे स्वागत केले. त्यानंतर परिसरात उभ्या केलेया ग्रंथविक्री व प्रदर्शनाचे उद्घाटन डॉ. देशपांडे व इतर मान्यवरांनी फीत कापून केले.

प्रथम व्यासपीठावर सर्व मान्यवर स्थानापन्न झाल्यावर बालसाहित्यकार धों. वे. जोगी व नुकतेच दिवंगत झालेले ज्येष्ठ साहित्यिक रवींद्र भट ह्यांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहून संमेलनाची सुरुवात झाली.

गायक रुपेश व दिगंवर पाटील यांनी सरस्वती स्तवन सादर केले. निमंत्रक मा. प्राचार्य डॉ. बी. एन्. पाटील यांनी प्रास्ताविक केले. उद्घाटक डॉ. सावरकर व इतर मान्यवरांच्या हस्ते दीप प्रज्वलन झाले. त्यानंतर डॉ. वि. भा. देशपांडे यांनी संमेलनाची सूत्रे डॉ. चौधरी यांच्याकडे सुपूर्द केली. स्वागताध्यक्ष मा. भाऊसाहेब वाघ यांचे स्वागतपर भाषण झाले.

स्मरणिकेचे प्रकाशन म.सा.प.चे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांच्या हस्ते झाले. तसेच संमेलनाध्यक्ष डॉ. चौधरी यांच्या हस्ते 'विवेक रत्नावली', 'आसूड', 'गावाकडच्या कविता', गंमतीदार खेळांचा खजिना, इ. पुस्तकांचे प्रकाशन झाले. म.सा.प. पुणेच्या प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी आपले मनोगत व्यक्त केले.

संमेलनाध्यक्ष डॉ. प्रभाकर श्रावण चौधरी यांचे अध्यक्षीय भाषण झाले. सौ. हेमलता पाटील यांनी आभार प्रदर्शन केल्यावर हा उद्धाटन सोहळा संपला.

'बोलींचे मराठी साहित्याला योगदान' या विषयावरील परिसंवाद म.सा.पत्रिकेचे संपादक डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली झाला. डॉ. किसन पाटील यांनी विषयानुरूप बीजभाषण केले. झाडी बोली- डॉ. हरिश्चंद्र



पाचोरा येथे विभागीय साहित्य संमेलनात म.सा.प.चे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांची मुलाखत घेताना डॉ. किसन पाटील आणि डॉ. कल्याणी दिवेकर

बोरकर, मराठवाडी बोली प्रा. केशव देशमुख, आदिवासी बोली डॉ. पुष्पा गावित व वऱ्हाडी बोली डॉ. प्रतिमा इंगोले यांची भाषणे झाली. अध्यक्ष डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांनी या परिसंवादाचा अध्यक्षीय समारोप केला. सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन प्रा. आशुतोष पाटील यांनी केले.

थोर नाट्य समीक्षक व म.सा.प.चे विद्यमान कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांची प्रकट मुलाखत डॉ. कल्याणी दिवेकर व डॉ. किसन पाटील यांनी घेतली.

यानंतर खानदेशी भोजनाचा आस्वाद सर्वांनी घेतला.

डॉ. प्रतिमा इंगोले यांच्या अध्यक्षतेखाली कथाकथनाचा बहारदार कार्यक्रम रंगला. नारायण, शिरसाळे-जळगाव, विलास सिंदगीकर-लातूर, अशोक कौतिक कोळी-सुनसगाव, सौ. पूर्णिमा इंडीवाले जळगाव व दीपध्वज कोसोदे-मुक्ताईनगर यांनी कथाकथन केले.

त्यानंतर संमेलनाध्यक्षांच्या उपस्थितीत एक दिवसीय विभागीय मराठी संमेलनाचा औपचारिक समारोप झाला.

ज्येष्ठकवी उत्तम कोळगावकर यांच्या उपस्थितीत आणि जगदीश देवपूरकर, प्रा. शशिकांत पाटील, डी. बी. जगत्पुरीया यांच्या सूत्रसंचालनाने खानदेशी कवींचे कवीसंमेलन रंगले. कवी कोळगावकर या कविसंमेलनाचे अध्यक्ष होते. प्राचार्य भगवान ठाकूर, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, अशोक नीलकंठ सोनवणे, सुशील पगारीया, भगवान ठग, मधु साळी, भटकर, अरुण नारखेडे. अशोक कोतवाल, इत्यादी सुमारे ७०/८० कवींनी या कविसंमेलनात भाग घेतला.

'आदल्या दिवशी रात्री' पाचोऱ्यातील मानसिंगका रिक्रिएशन क्लबच्या पटांगणावर 'गाणी बहिणाईची' हा बहिणाबाईंच्या काव्यावर आधारित कार्यक्रम झाला. डॉ. माधवी वैद्य आणि त्यांचे सहकारी डॉ. लीना राजवाडे, डॉ. वृषाली पटवर्धन, राहुल घोरपडे व निलेश श्रीखंडे यांनी हा कार्यक्रम उपस्थित रसिकांसमोर सादर केला. प्रायोजक रोटरी क्लब ऑफ पाचोरा व भडगाव हे होते.

वृत्तांत लेखन : **दीपक करंदीकर, पुणे**
स्वीकृत सदस्य, म.सा.प.पुणे.





अनुक्रमणिका

# विनम्र श्रद्धांजली !



### प्रा. गंगाधर गाडगीळ

मराठी साहित्यातील एक सदाहरित पान कालवश झाले. साहित्याच्या सर्व दालनातून त्यांनी मुक्तसंचार केला आणि आपल्या वैशिष्ट्याचा ठसा उमटविला. १९४६ ते २००० पर्यंत त्यांचे ३४ कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. कथातंत्राचे ओझे कथेवर नसावे. कथेचा विस्तार कथानुकूल असतो; याची प्रथम जाणीव गंगाधर गाडगीळांनी दिली. मराठी कथाविश्वात आणि नाटकात बंडू आणि स्नेहलच्या जोडीने निर्मळ विनोदाचा आविष्कार दिला. गाडगीळांच्या नर्मविनोदी शैलीचे दर्शन बंडूच्या माध्यमातून आणि 'फॅण्टसी' शैलीच्या कथांमधून प्रकट होते.

पाच कादंबऱ्या, आठ प्रवासवर्णने, ६-७ नाट्यकृती, विनोदी ललितलेखन, 'साहित्याचे मानदंड' आणि 'खडक आणि पाणी' इ. एकूण आठ आस्वादक समीक्षापर ग्रंथ, सात प्रवासवर्णने आणि विविध प्रकारची एकूण आठ बालसाहित्याची पुस्तके अशी विपुल आणि दर्जेदार ग्रंथसंपदेने प्रा. गाडगीळ मराठी साहित्यातले श्रीमंत लेखक होते.

त्यांच्या स्मृतिप्रित्यर्थ, युवा आणि मुक्त गटासाठी कथास्पर्धेचे आयोजन महाराष्ट्र साहित्य पत्रिकेने केले आहे.

मराठी साहित्याच्या इतिहासातील मोठ्या कालखंडाचा समारोप, प्रा. गंगाधर गाडगीळांच्या निधनाने झाला आहे. त्यांना आदरपूर्वक श्रद्धांजली.

# विनम्र श्रद्धांजली !



### रवींद्र पिंगे

रवींद्र पिंगे हे नाव मराठी साहित्यात ललितलेखनाच्या संदर्भात अग्रक्रमाने घेतले जाते. जीवनाच्या बहुविध अंगांचे सौहार्दपूर्ण दर्शन त्यांनी आपल्या लेखणीने चिरस्थायी केले आहे. त्यांच्या ललितगद्यास संशोधनाची एक किनार होती.

बहुविध ठिकाणी प्रवास करून त्यांनी आपल्या लेखनास आत्मनिष्ठेची जोड दिलेली आहे.

सुमारे २५ ललितग्रंथ त्यांच्या नावावर असून त्यातील 'दिवे-लामणदिवे' हा ग्रंथ उल्लेखनीय आहे.

महाराष्ट्र शासनाचे व अन्य संस्थांचे अनेक साहित्य पुरस्कार त्यांना प्राप्त झाले. ते उत्तम वक्ते होते आणि अजातशत्रू होते.

त्यांना विनम्र श्रद्धांजली !

- संपादक









अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

## जेव्हा सर्वोत्तम होण्याची तुमची आहे कामना
## आम्ही तुमच्या सोबती राहू पदोपदी !



### [illegible] होणे साधारण आहे...सर्वोत्तम होणे असाधारण आहे.

सार्वजनिक क्षेत्राच्या तीन अग्रणी बँकेतली एक सेंट्रल बँक ऑफ इंडियाचा नेहमी असाधारणावर विश्वास आहे. मग ते आमचे लाभप्रद उत्पाद असो किंवा तुमच्या सोयीसाठी आमच्या सेवा असोत यातील प्रत्येकाची आखणी काळजीपूर्वक आणि अचूक पद्धतीने केली गेली आहे. ज्यामुळे सुनिश्चितपणे मिळते सफलता आणि समाधान. आमच्या ग्राहकाची वृद्धिंगत संख्या याची साक्षी आहे.

दूर दूर पर्यंत पसरलेल्या आपल्या ३२८२ शाखांच्या अखिल भारतीय मजबूत नेटवर्क (१००० पेक्षा जास्त सीबीएस शाखांसकट) बरोबर यथा इंटरनेट बँकिंग, एसएमएस बँकिंग, एटीएम बँकिंग, वर्तमान आधुनिक सोयी आणि कुठेही बँकिंग सारख्या बरोबर.... सर्वोत्तम देण्याच्या परंपरेला अनुसरून आम्ही लाखो ग्राहकांपर्यंत पोचलो आहोत !

आमच्या नुकत्याच प्रारंभ झालेल्या काही सेवा निम्नवत आहेत.

- इंटरनेट बँकिंग
- एसएमएस बँकिंग
- शैक्षणिक कर्जासाठी ऑनलाइन अर्ज
- ई पेमेंट / आरटीजीएस / नेफ्ट / ईसीएस
- सेन्ट उडान पायलट प्रशिक्षणासाठी वित्तीय सहाय्य
- ज्येष्ठ नागरिकांसाठी रिवर्स मॉर्गेज कर्ज
- डिमॅट खाते




या, अधिक चांगल्या जीवनास घडवू या.

www.centralbankofindia.co.in



अनुक्रमणिका

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : October to December 2008
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57




प्रेषक
बुक-पोस्ट




प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे-४११०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.

